# तीन शिल्पकार

लेखक- अरुण कुळकर्णी
८,ग्रीनपार्क सोसायटी,
सुसेन-तरसाली रोड
वडोदरा-३९००१०
मो. ०७३५९२१२२११,
Email- Kulkarni@technique-baroda.com
Arungk1943@gmail.com



ई प्रकाशक :
ई साहित्य प्रतिष्ठान
www.esahity.com
esahity@gmail.com
ई प्रकाशन : १७ जानेवारी २०१७




# तीन शिल्पकार

त्यांचा आणि सुधारलेल्या जगाचा काहीच संबंध नव्हता. ते आपल्याच विश्वात दंग होते.

माझ्या आलिशान फ्लॅटच्या गॅलरीत पावसाच्या पागोळ्यांकडे एकटक पहात माझी तंद्री लागली होती. एक समर्थ चित्रकार म्हणून नाव सगळीकडे पसरले होते. कागदावर काहीही काढले तरी नांवामुळे किंमत चढीच लागायची. आज मुंबईत स्वतःचा आलीशान, खरोखरच शान वाढवणार फ्लॅट, खाली सुंदर गाडी, घरात नोकर अशा थाटात रहाणी होती. घरचे सगळे आनंदात ही श्रीमंती उपभोगीत होते. पण मी मात्र नेहमी असाच तंद्री लावून भूतकाळात जाई. श्रीमंतीचा उपभोग घेणे मला जमत नव्हते.

विक्रोळीच्या डोंगर उतारावरच्या एका चाळीतले दिवस आठवत. ते सुरेश, मिलींद, शंकर व मी यांचे टोळके नजरे समोर येई. सगळेच जे.जे मधून फाईन आर्ट करणारे दोस्त. चित्रे रंगवून त्यावर चर्चा करण्यात वेळ घालवणारे. पैसे कमवायसाठी जाहीरातींच्या डिझाईनची कामे न घेणारे. चौघातल्या कोणाचाही खिसा म्हणजे आपलाच समजणारे दोस्त. “कफल्लक” हा शब्द “चित्रकार” यापेक्षा जास्त चिकटलेला.

शबनम पिशवीत रंगकामाचे सामान टाकून एक कॅनव्हास व स्टँड बरोबर घेऊन आम्ही वेगवेगळया दिशाना जायचो. चित्र विषय शोधायचे, एकादा चांगलासा वाटला तर तिथेच स्टँड वर कॅनव्हास चढवून चित्रे काढायचे ते दिवस. आयुष्यात पैसे कमावण्यापेक्षा आपले नाव करण्याचे चौघांचेही स्वप्न होते. धडपडत होतो. वडापाव वर दुपार भागवत होतो. घरी पैसे न देता आई वडिलांच्या सेवेमुळे रात्रीचे दोन घास व्यवस्थित पोटात जात होते. पण जिद्द सुटत नव्हती.

……

जोराची झड आली आणि पागोळया जोरात धार धरून वाहू लागल्या. डोळयासमोर एकदम् लख्खपणे शेवता आली. नदीतून बाहेर आलेली डोक्यावरून खाली चिकटून निथळणारे केस, त्यातून वहाणारे ते पाणी अगदी या पागोळयांसारखेच होते. मागून येणारी सखू. तशीच केसांतून पागोळया सांडीत येणारी. भला थोरला खडस मासा पकडून त्याला मिरवत पाण्यातून बाहेर येणारा शिवू. सगळे त्या गॅलरीच्या पागोळया मागे हंसत खिदळत उभे ठाकले. माझ्या चित्र विषयांचे नायक, नायिका. हे असेच केव्हाही पुढे ठाकायचे आणि मी विषण्ण व्हायचो.

माझे मन शेवता आणि सखूच्या साडयांसारखेच ठीक ठिकाणी विरले होते. या श्रीमंतीत कुटंब सुखावत होते. मी ही सुखाचा आव आणत होतो. पण अशी तंद्री लागली की हे तिघेही समोर दत्त म्हणून उभे राहायचे. ते त्या नदीसारखेच खळखळत हसायचे त्यांच्या काळया रंगातून पांढरे स्वच्छ दात दिसायचे. निर्मळ मनाची ती रानपांखरे माझ्या समोर पिंगा घालायची आणि मन अजून एका ठिकाणी त्यांच्या साडीसारखेच विरायचे. समृद्धी मला म्हणूनच बोचत होती. माझ्यातला चित्रकार बाहेर आणणारे, मला वेगवेगळया चित्र विषयांचे आव्हान देणारे, निस्वार्थ पणे मला आपल्या बरोबर जेवायला बसवणारे. दारिद्र्यालाही वरदान समजून जगणारे तीन अत्यानंदी जीव.

नेहमी अशी तंद्री लागली की मी भूतकाळात जात असे. सुरेश, शंकर, मिलींद आणि मी- युसुफ अली. काही तरी करून दाखवण्याची आस मनात बाळगून आणि शबनम पिशव्या गळयात आडकवून फिरणारे. जगण्यासाठी आणि खर्च काढण्यासाठी एकाद्या पुस्तकाचे कव्हर नाहीतर कॅलेंडरचे डिझाईन करण्याचे काम घेणारे. कोणालाही पैसे मिळाले की ते चौघांच्याही गरजा भागवण्यासाठी वापरणारे जीवश्च कंठश्च मित्र.

..........

एक दिवशी मिलींद म्हणाला, “सप्टेंबरात पहिल्याच आठवडयात कोकणात जाऊया का रे? निसर्ग फार सुंदर असतो तिथला. सह्याद्रीच्या पायथ्याच्या जंगलात कँप करूया आणि निसर्ग चित्रुया.”

“अरे खर्च परवडेल का?” शंकर

“पाव आमलेट नाहीतर वडापाववर राहुया. एकादा टेंट पाहू. बहुदा माझ्या चुलत भावाकडे आहे. तो ट्रेकींगला जातो ना! हॉटेलचा खर्च वाचेल.” मिलींदने आपले घोडे दामटले.

“चला रे जाऊया तो म्हणतो तर. निसर्गचित्राना कमीत कमी कॅलेंडर वाले तरी घेतात. प्रत्येकाने चार चार चित्रे काढली तरी सोळा होतील. सरासरी तीन हजार एकाचे पकडले तरी अठ्ठेचाळीस हजार होतात.” आमचा गणिती मित्र सुरेश अगोदरच हिशोब लावीत होता.

“बाजारात तुरी आणि ........” मी अर्धीच म्हण उच्चारली. कोरसमधे ती बाकीच्यानी पुरी केली. नंतरच्या हशातच कोंकणात जायचे नक्की झाले.

......

नदीच्या काठी ती एकाकी झोपडी होती. खाली दहा बारा फूटाचा घसरता भाग संपला की नदी सुरू होत होती. एका आंब्याच्या झाडाला खेटून ती झोपडी उभी होती. मातीच्या ओबड धोबड भिंती, नारळाच्या झावळयांचे छत व जुनाट लाकडी दरवाजा आणि तशीच एक खिडकी त्या झोपडीच्या दर्शनी भागावर दिसत होती.

पण दारात एक अप्रतिम सौंदर्य उभे असलेले दिसत होते. जुन्या पाच वारातले राहिलेले तीन वार शरीराभोवती साडी म्हणून तिने गुंडाळले होते. वर पोलका म्हणून जुनाट काहीतरी घातले होते. ज्याचा दंडावरचा एक भाग ठीक ठीकाणी विरून दंड उघडे दिसत होते. दारातच ती उभी होती. दाराला टेकून एका पायावर उभी होती. दुसरा पाय वाकवून तिने असा काही ठेवला होता की मुरली वाजवणाऱ्या कृष्णाच्या चित्राची आठवण यावी. जमिनीशी काटकोन करणारे एक पाऊल रंगभेद चांगलाच दाखवत होते. तिचा दंड, अर्ध्या साडीतून दिसणारे पाय, चेहरा तिचा कृष्णवर्णाकडे झुकणारा गडद सावळा रंग दाखवत होते. पण त्या पावलाचा तळभाग स्वच्छ गुलबट पांढरा दिसत होता.

एकंदर शरीर सौष्ठव असे होते की राजा रविवर्म्याची नजर पडली असती तर त्याने तिथेच ठाण मांडून तिला चित्रस्थ केले असते.

जसा जसा झोपडी जवळ जात होतो तसे तसे ते अप्रतिम चित्र आणखी स्पष्ट होत चालले होते. मी भारावून त्या चित्राला मनात साठवत पुढे पुढे जात होतो. बहाणा शोधण्याची जरुरच नव्हती. नदीकडे जाणारा रस्ता तिच्या झोपडी समोरच्या अंगणाला स्पर्शून जात होता. जसा जवळ गेलो तसे तिचे चुकार केस गालावर खेळताना दिसले. मंद वाऱ्याच्या झुळुका आणि तिच्या केसांची पकडा पकडी चालली असावी. आपले भोकरांसारखे मोठे डोळे करून ती लांबवर कुठेतरी पहात होती. बरेच झाले. चालता चालता माझे एकटक न्याहाळणे तिला माहीत पडले नव्हते.

अगदी अंगणा जवळ पोचलो आणि तिचे अगदी जवळून दर्शन होऊ लागले. गौर वर्ण, निळसर घारे डोळे, गालावरची खळी, नाहीतर एकादा ठसठशीत तीळ, लाल चटुक ओठ अशा सौंदर्य समृद्ध करणाऱ्या गोष्टीं पैकी एकही गोष्ट तिच्याकडे नव्हती. तरीही अप्रतिम सौदर्याचा एक पुतळा मी पहात होतो. काळ्या शाळीग्रामी दगडातून कोरलेल्या शिल्पासारखी ती समोर उभी होती. बांधेसूद शरीरयष्टी आणि फक्त प्रमाणबद्ध अवयवानी निर्माण केलेली एक शिल्पाकृती समोर जीवंत होऊन उभी असावी असे वाटत होते.

आता मात्र वाट अंगणाला वळसा देऊ लागली होती. ती वळून खाली नदीकडे जाणार आणि हे दर्शन नजरेसमोरून जाणार या विचाराने माझे पाय जरी नदीची दिशा घेऊन निघाले, तरी चेहेरा वळवून तिला पहाण्याचा मोह काही आवरला नाही.

व्हायचे तेच झाले त्या पायरस्त्यावरच्या एका छोटयाशा खड्‌यात पाय पडून मी धडपडलो आणि खालीच बसलो. पायातून वेगाने कळ गेली. उठायचा प्रयत्न केला तर पायातून परत कळ आली. समजलो पाय मुरगळला असणार. खाली बसून पायाला मी मालीश करू लागलो मुरगळ घालवायचे काही प्रकार माहीत होते. ते अवलंबीत होतो. माझ्या तोंडून बहुदा दुखरी विव्हळ गेली असावी. कारण मला कोणीतरी विचारतय असा भास झाला. स्पष्ट आवाजात पुन्हा एकदा ऐकू आलं.

“काय लागला काय? पाय मुरगाळला?” मी वर चेहरा केला तर समोर ते सौंदर्य माझीच चौकशी करताना दिसले.

मी पायाला मालीश करता करता होकारार्थी मान हलवली.

“आये! हे बघ हे भाऊ पडलेत, पाय मुरगाळला. हिकडे ये!” एक मध्यम वयाची बाई दारात आली. आणि विचारू लागली “काय गो सखू? कोण पडला?”

“हे बग हे भाऊ पडले. पाय मुरगळला. तू वशेद (औषध) करतेस ना. बग जरा.”

आता तिची आई पुढे आली. तिने माझा पाय निरखून बघीतला व म्हणाली.

“ताजाच दुखणा हा. शेकला तर लवकर आराम वाटात. जा गो सखू. भातासाठी आधण ठेवलय. त्यात कपडो भिजव आणि घेवन ये.”

माझाच पंचा तिने उचलून सखूच्या हाती दिला. बरोबर होते. ज्याना अंगावर ल्यायला धड कपडे नव्हते ते कुठला कपडा मला शेकायला आणणार होते?

दोनच मिनीटात सखू गरम पिळा घेऊन आली आणि तिची आई माझा पाय शेकू लागली. मला आराम वाटू लागला. हळू हळू उठून मी पायावर जोर देत उभा राहायचा प्रयत्न करू लागलो.

“अवो थांबा! जरा वेळ द्या! पोरीचा लगीन असल्यासारखे घाय काय करता? थोडा शेकून घ्या अजून. पंचा आणि कपडे घेवन काय नदीवर न्हायला चालला होता काय? नदीला होवूर (पूर) आलाय पाणी बघा केवढां हाय. व्हावन जाल.”

त्या बाईकडे आता माझी नजर गेली. ती जरी तिची आई होती तरीही ती देखिल तशीच कोरीव पुतळ्यासारखी होती. एवढी गरीबी ओसंडून वहाताना दिसत असूनही ह्या एवढया बांधेसूद, कोरीव कशा याचे मला आश्चर्य वाटत होते. दुखऱ्या पायाकडे लक्षच जात नव्हते, म्हणून दुखावा तेवढा भासत नव्हता.

पहिल्यांदा ती दारात उभी होती तशीच परत उभी राहीली, तशीच लांबवर आपल्या टपोऱ्या डोळ्याने काहीतरी न्याहाळते आहे अशी पोज तिने परत दिली तर?

“सखू! जा लींगडीचो पालो तोडून आण. चेचून लेप करूया.” आता यांचे गांवठी उपचार चालू होणार हे समजलो. दिवस वर चढत होता. दुखरा पाय घेऊन दगडाळ नदीत, तेही पूर आलेल्या नदीत उतरून आंघोळ करणे शक्यच नव्हते. आता तर पाण्याचा आवाज वाढत चालला होता. सहज लक्ष नदीकडे गेले. पात्राचे पाणी खूप वर चढले होते. बहुदा नदीच्या वरच्या प्रदेशात भरपूर पाऊस पडत होता असणार. कोंकणातील नद्या त्या. अशा वेळी केव्हा पाणी वाढेल, पुराने नदी दुथडी भरून वहायला लागेल याचा नेम नव्हता. आता तर नक्कीच परत जावे लागणार होते. मी उठण्याचा प्रयत्न केला. पाय बराच निवळला होता. पण चालताना भार पडला की असह्य कळ येत होती. मला उभा होताना पाहून लिंगडीचा पाला घेऊन येणारी सखू ओरडू लागली. “भाऊ बसा! बसा! पडाल. गरम लेप लावून घेवा आणि तासाभरान बरे वाटले मग जा.”

मी परत बसलो. त्यांच्या सहवासात जास्त वेळ राहाण्याची इच्छा की दुखण्याची भिती? कशामुळे मी थांबलो हे नक्की समजत नव्हते.

पाला घेऊन ती घरात गेली. कुटण्याचा आवाज येवू लागला. मायलेकी आत काय करतात ते पहाण्याची खूप इच्छा झाली. पण दोनच बायका मग आपण कसे एकदम घरात जायचे?

थोडयाच वेळात एका दगडीत वाफा येणारा लेप घेऊन मायलेकी बाहेर आल्या. माझा मुरगळलेला पाय आता घोट्यात सुजल्यासारखा वाटत होता. लवकर कँपवर जाऊन आयोडेक्स किंवा एकादे सूज आणि दुखावा थांबवणारे औषध लावावे असा विचार आला. पण त्या अगोदरच माझ्या पायावर गरम गरम लेप चढू लागला.

“आये! बाबा आला बग.” असे म्हणत सखू उठली नदीच्या दिशेने सुसाट धावत निघाली. माझे लक्ष तिकडे गेले. मी थोडासा वळलो.

“इतक्यात उठू नुको. अर्धा तास बसा. मग जा” म्हणत तिची आई उठली आणि अंगणात गेली.

नदी कडून एक उंचापुरा चमकणाऱ्या काळया कांतीचा पुरुष येताना दिसला. तो देखिल एका रेखीव शिल्पा सारखाच. प्रत्येक अवयव प्रमाण बद्ध... कमरेवरच्या करदोटयात एक विटलेला पांढरा फडका त्याने खोवून समोरून पसरला होता. तरी देखिल तो पूर्णपणे त्याच्या मांडया झाकू शकत नव्हता.

बाप आणि लेक मजेत हसत जवळ आले. अंगणात आले. त्यांच्या काळया सावळया चेहेऱ्यातून स्वच्छ पांढरे दात हसताना चमकत होते. तिघे गरीब असूनही एवढे शरीर सौष्ठव?

तो अंगणात आला. त्याच्या हातात चार पाच वेलीच्या दोरासारखे वाटणारे काहीतरी होते. त्यांत त्याने काळे काळे एकाच जातीचे मासे नीट ओवले होते. बरोबरची सखू एक भला थोरला खवले असलेला चंदेरी मासा हलवत घेऊन येत होती.

“आये! आज आपण भात आणि हा मासा खावया काय.” सखू

“होय! होय! जा साफ कर. मी येतय रांधूक.” आई

“हे कोण! काय झाला? पाय मोडला कसा?” सखूचा बाबा आता माझी चौकशी करीत होता.

“नदीवर जायत होते. घरासमोरचा पाय खड्‌यात आला आणि मुरगळला. आयेन लेप करून लावलान. आता जातील थोड्‌या वेळान.” सखूने थोडक्यात सांगून दिले.

तो माझ्याजवळ बसला पाय हातात घेऊन घोटा हळूवार निरखू लागला. पाऊल त्याने हातात घट्ट पकडले होते. काहीच कल्पना न देता त्याने पावलाला झटका देत असे काही फिरवले की मला ब्रम्हांड आठवले. जोरदार कळ मस्तकात शिरली.

“अग आई ग! मेलोss” मी जोरात ओरडलो.

“काय नाय! संध्याकाळ पर्यंत धावाल तुमी.” तो हंसत मला म्हणाला. त्याच्या रानटीपणाचा मला राग येत होता. पण त्यांचा सेवाभाव देखिल उमगत होता.

अर्धा तास झाला असेल पायाला खूपच आराम वाटू लागला. सखूची आई माशाचे कालवण बनवत असावी त्याचा घमघमाट सुटला होता. त्यांच्या जेवणात व्यत्यय नको म्हणून मी उठलो. निघणार येवढयात विचार आला. तिघानाही चित्रात बंदीस्त केले तर? तोंडून निघाले. “मी निघतो. पाय खूप बरा आहे. तुम्हाला खूप त्रास दिला. पण एक विचारू?”

“ईचारा काय ईचारताय?”

“तुमचे सगळयांचे एकत्र चित्र काढायला द्याल मला? उद्या येईन मी.”

“चित्र? म्हणजे फोटू? तो कशाला? अंगार कपडे नाय नी आमचा फोटू काडून काय करणार?” सखूचा बाबा.

त्याला चित्र आणि फोटोतला फरकही माहीत नव्हता. काय सांगणार मी? पण चंग बांधला ह्याना कॅनव्हासवर घ्यायचेच जसे आहेत तसेच जीवंत करायचे कागदावर.

“उद्या सकाळी येईन मी पाय बरा असला तर” एवढे बोलून मी निघालो. जंगलातल्या त्या वाटेने मी कँपकडे निघालो. पायाने जरा लंगडत होतो. पण बरेच सुसह्य वाटत होते.

......

हो आम्ही चार चित्रकार मित्रानी ठरवून कोकणची ट्रीप केली होती. सह्याद्रीच्या पायथ्याच्या घनदाट जंगलात तंबू लावून कँप करायचा आणि कोकणाच्या निसर्गाची मनसोक्त चित्र काढायची असे ठरवून आलो होतो. मात्र प्रत्येकाने वेगवेगळ्या जागी जाऊन आपले चित्र काढायचे. एकमेकाना अजिबात भेटायचे नाही. फक्त रात्रीच एकत्र यायचे. मनावर दुसऱ्याच्या चित्राचे परिणाम नकोत म्हणून चित्रे पुरी होईपर्यंत एकमेकाना दाखवायची नाहीत असा अलिखीत नियम सगळ्यानी पाळायचा असे ठरवले होते.

मी ठरवलेले चित्र निसर्ग चित्रात बसत नव्हते. नाही बसले तरी चालेल असा विचार करून मी ठाम निर्णयावर पोहोचलो. त्या तिघानाही कॅनव्हासवर जिवंत करायचे हे नक्कीच.

रात्री जेवताना सर्व एकत्र झालो होतो. कोकणाच्या निसर्ग सौंदर्याची भरभरून स्तुती चालली होती. पण मी त्यात नव्हतोच. मी परत परत त्या तिघानाही आळीपाळीने मनात आवर्जून आणीत होतो. त्यांच्या चेहेऱ्याचे, चालण्या, बोलण्या, हसण्याच्या लकबींचे मनात चित्रण करून ठेवीत होतो. तिघानाही एकाच चित्रात बसवावे की प्रत्येकाचे वेगवेगळे चित्र काढावे. मागे नदी, पडके घर, आंब्याचे झाड कोणत्या कोनाने जास्त उठून येईल. असल्या विचारात गुंग होऊन गेलो होतो.

“काय अलीमिया! काही बोलत नाही तुम्ही? फार विचारात दिसता” नवखा चित्रकार असलेल्या मिलींद साखरदांडे विचारत होता.

“काय रे अलीमिया! काय दडवतोयस? काय छान साईट मिळाली काय रे? कसल्या विचारात आहेस?” शंकर जोशी विचारत होता.

“मी काय म्हणतो. निसर्ग चित्रात जंगलातील जनावरं, पक्षी, झाडे जर येऊ शकतात तर माणसे का नसावीत?” माझ्या तोंडून अलगद प्रश्न निघाला.

“कोण म्हणतं नसावीत? असावीत ना पण त्यांना प्रॉमिनन्स नसावा. एकाद्या चित्रात लांब शेतात असलेला शेतकरी दिसला तर त्याची आकृती येणारच चित्रात. पण पूर्ण कॅनव्हास वर त्याला चित्रवला तर निसर्ग कुठे दाखवणार रे?” शंकरने आपले मत सांगीतले. मी निरुत्तर होऊन गप्प बसलो.

सर्व आटोपून झोपी गेलो. पण मला झोप येत नव्हती. पाहू काय करायचे ते. मग त्या तिघांच्या आकृतींची मनात उजळणी चालू झाली. पहाटे केव्हातरी झोप लागली.

जाग आली ती झंझावाती वाऱ्यामुळे आणि जोरात पडणाऱ्या पावसामुळे. तंबू झंजावाती वाऱ्याने उडून जाणार की काय असे वाटू लागले होते. कोकण ते. चारी बाजूनी पाण्याचे लोट वहाताना दिसत होते. सरत्या पावसाळ्यात कोकणचे निसर्ग सौदंर्य खुलून दिसते म्हणून आम्ही ही वेळ साधून कोकणात आलो होतो. पण आता जर असाच पाऊस पडत राहीला तर?

पाण्याची झड लागू लागली तसे लगबगीने सामान आवरू लागलो. कॅनव्हास, पेपर्स प्लॅस्टीकमधे गुंडाळून ठेवत होतो. हे काम पुरे होत आले. एवढयात वारा पाऊस एकदम थांबले. पुढच्या क्षणी पूर्वेला तांबडे फुटत असलेले दिसू लागले. हुश्श वाटून सर्वानी सुटकेचा श्वास सोडला.

मी जरा लगबगीनेच तयार झालो. सर्वांबरोबर खालच्या नदीवर आंघोळीला जाण्याऐवजी, ठरवले की त्या घराजवळच्या नदीवरच आंघोळ उरकायची. सकाळच्या किरणांचा उपयोग करावा व त्या प्रकाशात त्या तिघांचे चित्र काढावे म्हणून लगबग करीत होते. सर्व आटोपून मी त्या झोपडीकडे निघालो. बाहेरून हाळी दिली. झोपडीत त्या दोघीच होत्या. तो कुठेच दिसत नव्हता.

“भाऊ पाय बरा झाला ना? लिंगडीचा गरम लेप दुखी घालवतो बघीतलात ना?” ती मुलगी दारात येऊन मला म्हणाली.

“तुझे बाबा कुठे गेले?”

“ते सकाळच्याला मासे पकडायला गेले. खाली नदीत आसतील बघा. नदीला पाणी चढलाय, मासे चांगले मिळतात म्हणून गेले.”

तिच्यावर पडण्याऱ्या तिरकस सूर्य किरणानी तिच्या काळ्या कांतीला सोनेरी झालर लावली होती. माझ्यातला चित्रकार उतावळा होत होता. हिचे असेच सूर्य किरणातले चित्र रेखाटू का? असा विचार आला. तिला म्हणालो.

“कालच्यासारखी दारात उभी रहा. एका पायावर दुसरा पाय मुडपून.”

“म्हंजे कसा? मला नाय बाय समजले.”

मी दारात गेलो. काल ती उभी होती तशी पोझीशन तिला दाखवावी म्हणून स्वतः उभा व्हायला गेलो. पण उंची नडली. वरच्या चौकटीवर डोके आपटले. जरासे दुखले खरे पण लगेचच सावरले. तिला हसू आवरत नव्हते.

“काय गो कोण हाय भायर” असे म्हणत तिची आई बाहेर आली.

“भाऊ तुम्ही आलात? पाय बरा हाय ना? दुकत आसल तर परत लेप करूया काय?”

“नको! नको! पाय बरा आहे. मी तुमच्या तिघांचे एक चित्र काढीन म्हणालो होतो ना म्हणून आलोय.”

“अरे! बापरे! हे तर गेलेत मासे मारायला. मग कसां करणार तुमी?”

“काही नाही एक एकाचे काढीन मग एकत्र करीन. एक काम करा ना, सखूला दारात उभी करा ना, काल उभी होती तशी. ती पोज चांगली होती.”

“काय चांगली हुती?” मी समजलो हिला एकही इंग्रजी शब्द कानावर पडला देखिल नसेल. मी परत दारात उभा राहिलो. पोज दाखवली. तसे तिने सखूला म्हटले, “सखू रोज तर रवतेस अशीच उभी. त्यात काय धाड मारायची, ऱ्हा उभी.”

सखू उभी राहिली तिला हात कसा घ्यायचा, कुठे नजर लावून उभे राहायचे हे दाखवून मी अंगणात उतरलो. कॅनव्हास स्टँडवर लावून सगळी तयारी केलीच होती. तिच्याकडे बघत मी पेन्सिल उचलली तेवढयात खळखळत हसत सखू चौकटीच्या मागे गेली कमरेत वाकून ती हसत सुटली. तशी तिची आई देखिल हसू लागली. मी आजूबाजूला नजर फिरवली. या हसतात का हेच समजेना. मग एकदम म्हणालो,

“ए! कशाला हसताय? सखू रहा उभी लवकर सकाळची किरणे उतरली तर आजचा दिवस फुकट जाईल.”

“लाज येता ना तिला. म्हणून हसता. फोटू काढला नाय कधी. म्हणून लाज येता.” तिची आई.

लाज अशी देखिल दाखवता येते हे मला नवखे होते. कसे बसे समजवून मी तिला परत उभे राहायला मनवले. चित्र सुरू केले. किरणांचा अँगल ठरत होता. बांधेसूद आकृति कागदावर उतरत होती. पण त्या बरोबर बरीचशी सखू मनावर ठसत चालली होती. मधून मधून ती त्याच स्थितीत एकदम हसू लागायची, गदगदून आतल्या आत हसत होती. ते पाहून तिची आई म्हणाली,

“अगो हसतेस काय. फोटू चांगला नुको यायला. नायतर वांदर वाटशील.” वर खळखळून हंसली.

अनवधानाने तिने माझ्या चित्रकसबावर वार केलेला तिच्या ध्यानीही नव्हता. एकाद्या स्त्रीला लाजावे कसे हे सुद्धा माहीत नसलेले, एक अगदी आदीवासी कुटुंब माझ्या समोर मी चित्रीत करणार होतो. शहरी शिष्टाचार जराही माहीत नसलेले. जाणण्याची इच्छाही नसलेले लोक होते ते. आपल्याच विश्वात हंसत खेळत सुखाने जगणारे. एकीकडे हात चालत होता तर दुसरीकडे मनात त्यांच्याबदलचे विचार चालू होते. कोण असतील हे. यांच्यात लग्न, पूजाअर्चा कसे होत असेल.

हात झर झर चालत होता. चेहऱ्याचे डिटेलींग जास्त लवकर पुरे करून त्याला सकाळच्या किरणांची लव्हाळी चढवली होती. आडवा हात देखिल किरणानी चमकवला होता. ब्रश आपले काम करीत होता. वेळ किती झाला ते समजले नाही.

“मी जाव? कामे पडलीत” असे म्हणत सखू सरळ उतरून चालू लागली. आई पण उठली. माझ्या मागे येऊन पाहू लागली. चित्र तर अजून खूप पुरे करायचे होते.

“काय हो ही कोण काढलात? सखू वाटत नाय.” आई

“अहो अजून वेळ आहे. दोन तीन दिवसानी वाटेल साम्य चित्रात आणि तिच्यात.”

“नक्की ना? आमालाय फोटू द्याल ना?”

आता मात्र मी हादरलो. हिला हे चित्र दिले तर मी काय करणार. पण मी हसलो म्हणालो, “हो तर तुम्हालाही देणार पण त्या आधी तुमचा आणि सखूच्या बाबाचाही फोटो काढणार मी. मग तिघांचा एकत्र करून एक तुम्हाला देईन. तुम्हाला काम नसले तर तुम्ही उभ्या रहाता का?”

“मी? मी नाय बाय! मला कायतरीच वाटता.” काही नाही मी सांगेन तसे उभे रहा. फोटो काढतोय हे मनात आणूच नका. पहा कसा सुंदर फोटो काढतो ते.

कशी बशी तिला मी मनवत तयार केली. दाराच्या चौकटीकडे नेऊन सांगीतले.

“इथे सखू मघाशी उभी होती ना? ती तशीच उभी आहे असे समजा आणि या भिंतीला उजवा खांदा लावून टेकून उभ्या रहा. सखूकडे पहाताय असे वाटले पाहिजे.”

“ते कसा? सखूला उभी करा तर बगेन ना? असां आढयाकडे बघून काय फोटू घेणार?”

कठीण होत होते. याना समजवण्यातच फार वेळ जात होता. पण शेवटी मी स्वतःच उभा राहून पोज दाखवली परत परत उभी करून पोज मनासारखी येतेय हे पाहिले आणि परत माझ्या जाग्यावर येऊ

लागलो. माझ्या स्टँड समोर सखूचा बाबा उभा होता डोक्यावर ताजे काढलेले चारपांच नारळ एका हाताने सावरत व दुसऱ्या हातात माशांच्या माळा घेऊन तो चित्राकडे एकटक बघत होता.

“काय काढलाव. हा काय फोटू हाय? जरा बरोबर काडा. माणूस समजत पण नाय. असला कसला फोटू?”

“अहो अजून दोन तीन दिवसानी बघा. आत्ताच बघू नका. चला तुम्ही आलात ते बरेच झाले. दोघांचेही आऊटलाइन काढून घेतो.”

त्याला हाताला धरून घराकडे नेऊ लागलो. तो पर्यंत त्याच्या बायकोने आपली जागा सोडली होती. घरात जाऊन पाण्याचा लोटा घेऊन आली. तो पाणी पिऊ लागला तसे एकटक कौतुकाने बघत म्हणाली.

“नारळ पाडप केलात. चारच नारळ दिलेनी. किती पाडलेत नारळ? किती झाडार चडलात. मला एक नारळ सोलून द्या. चांगले कालवण करते दुपारला.” त्याच्या कुठल्याच उत्तराची वाट न बघता ती घरात गेली आणि कोयता घेऊन आली.

त्याने एक नारळ पुढयात घेतला आणि सोलायला सुरवात करण्याची पोज घेतली. डाव्या पावलाचा आधार नारळाला दिला. उजवा पायाचा गुडघा वर करून जमीनीवर घट्ट रोवला आणि उजव्या हातातल्या कोयत्याने पहिला वार त्याने नारळावर केला मात्र मी एकदम ओरडलो.

“थांब!”

त्याच्या त्या कोरीव मांडया, पोटऱ्या, काळी कभिन्न शरीर यष्टी भरदार पिळदार दंड आणि कोरीव लेण्यासारखे ते दृष्य माझ्यातल्या चित्रकाराला आव्हान देत होते. त्यांच्या पोजेस मनात ठरवल्या. एका क्षणांत प्रतिबिंब मनावर ठसले.

“थांब बाबा! जरा थांब. मी सांगतो तिथे बस आणि फोड नारळ. तुझ्या बायकोलाही बोलव.”

त्याला दाराच्या चौकटीच्या डाव्या बाजूला भिंती जवळ नेऊन बसवले. दाराची चौकट मोकळी ठेवून उजव्या बाजूला तिला मगाचसारखीच उभी केली. गयावया करीत म्हणालो.

“असेच रहा थोडा वेळ. पटकटन रेखाटतो तुम्हाला.”

भरभर मी रेखाटू लागलो. तो मधेच कोयता उचलून नारळावर धाव घालीत होता मी ओरडत होतो. त्याला थांबवत होतो. ते बघून त्याची बायको पदर तोंडाला लावून खुदखुदत होती. आपली पोज बदलत होती. मी तिच्याकडे जाऊन पोज ठीक करीत होतो. तो मधेच पाय खाली करून फतकल मारून बसत होता. त्यालाही नीट बसायला लावत होतो. माझी तारांबळ उडत होती. चित्र त्यामुळे हळुहळु

रेखाटले जात होते. पण राग येत नव्हता या चॅलेंजची एक वेगळीच मजा वाटत होती. उत्साह वाढवीत होती.

सुर्य वर येत होता. एकाच कॅनव्हासवर मुलीच्या पहिल्या रेखाटलेल्या चित्राच्या बाजूलाच मी या दोघाना रेखांकीत करत होतो. काय झाले कोण जाणे. तो एकदम उठला आणि काही सामान गोळा करू लागला. बांबूच्या कामट्यानी बनवलेले एक निमुळते होत जाणारे टोपली विणतात तसे विणलेले काहीतरी त्याच्या हातात होते. एक फाटके तुटके जाळे. आणि पांच टोके असलेला भाला घेऊन तो चालू लागला. मी त्याला बसायचा आग्रह करत होतो. तो हातावरे करत सांगत होता. “येतोच” असा हावभाव करीत बाहेर पडून नदीच्या दिशेने निघाला. बहुदा मासे पकडायला गेला होता. त्याची बायको पण निघाली. मी एक निःश्वास सोडला. त्यांच्या कलानेच घ्यावे लागणार होते.

मी ब्रश उचलले. रेखाटलेल्यात रंग भरू लागलो. मनात ते चित्र स्पष्ट दिसत होते. तसेच हात चालत होते. त्या मुलीचे व्यक्तित्व अतिशय जीवंत दिसू लागले. दोन तास केव्हा संपले समजलेच नाही माश्यांच्या वासाचा भपकारा आला म्हणून मागे वळून पाहिले तर तो दोन भले मोठे मासे एका हातात लोंबवीत व काळे मासे त्या बांबूच्या टोपलीत पकडून एक टक माझ्या कॅनव्हासकडे पहात होता.

“सखू वाटताय! फोटू अजून चांगला दिसंल आसं करा.” एवढे बोलून तो चालू लागला.

एवढयात घामाघूम झालेली सखू घराला वळसा घालून आली. ओच्यात काहीतरी भरून घेऊन आली होती. पडवीतच तिने ओचा खाली केला. ओल्या मिरच्या आणि हळदीची ताजी पाने जमिनीवर पडली. आई आतून बाहेर येत म्हणाली, “सखू मिरच्यो छान झाल्योत, हळदीची ताजी पाना घालून रांधते, भाऊ! भात आणि कालवण खाशाल आमच्या संगत?” ती मला विचारत होती.

“मी आणलेय जेवण माझे. तुम्ही घ्या जेवून.” मी म्हणालो त्यांनी सगळे जेवण पडवीतच आणले.

मातीच्या मडक्यातच भात व कालवण बनवले होते. तीन पसरट तव्या सारख्या मातीच्याच प्लेटस् होत्या. पाणी घ्यायचे गडू मात्र पितळेचे होते. तेही जुनाट पोचं आलेले. दारीद्रयाचे पूर्ण प्रतिबिंब त्यांच्या संसारात लख्ख दिसत होते. कुठेही सद्य जगाचा संपर्क लागलेला दिसत नव्हता. मलाही त्यांनी आपल्या बरोबर पडवीत जेवायला बसवले.

वरच्या छापरातून केंबळयाला पडलेल्या भोकातून बरेच कवडसे सर्व पडवीत पसरले होते काही आमच्या शरीरावर पडत होते. एक कवडसा मात्र सखुच्या आईला सतवत होता. अगदी तोंडावरच पडत

होता. ती सखूला किंवा नवऱ्याला काही विचारायला गेली की तो मधेच डोळयात जायचा आणि ती आपली मान एका बाजुला कलवायची.

माझ्यातला चित्रकार हे सगळे टीपत होता. हे सगळेच कॅनव्हासवर उतरले तर. खूप चित्रे बनतील. एक एक्झीबिशनचे मटेरीयल मला त्या रानात, एका पडक्या झोपडीत ठासून भरलेले मिळत होते.

मी माझे जेवण काढले. जेवण कसले, दोन अंडयांचे एक आमलेट व दोन गोल पाव. मी ते काढले मात्र ओशाळे वाटू लागले. त्यांना काय देणार? ते तिघेही आता डोळे विस्फारून माझ्या जेवणाकडे पहात होते.

"एवढाच? भूक नाय लागत?" सखूची आई.

"भात नी कालवण दे. उपाशी ऱ्हातील" शिवू.

मी नको नको म्हणत असतानाही तिने एका पानावर भात वाढून आणला. भाताचा डोंगर होता. तो बघून मी हबकलोच "मी एवढा भात नाय खात दुसरे पान द्या. मी पाहिजे तेवढाच घेतो." पान आले तसे मी एक मूठ जेवढाच भात घेतला. सखू एकदम गडगडाट हसू लागली. मगोमाग तो आणि सखूची आई देखिल हसत सुटली. हसण्याचे कारण मी होतो हे मनात ताडले पण का?

हसण्याचा जोर ओसरला तसा तो म्हणाला, "भाऊ एवढाच भात? भात कसा शेराचा जेवायचा. तब्येत छान ऱ्हाते." व परत हसू लागला. त्यांच्या पानात खरोखरच भात डोंगरा सारखा वाढला होता.

आता तिने कालवण घालयला सुरवात केली. भाताच्या डोंगरात मधे खड्डा करून दोघे वाट पहात होते तिने वर कालवण नावाचे लालसर पिवळे पाणी ओतले आतले माशांचे दोन तुकडे शेवटी वर घातले. मग माझ्याकडे वळली. माझा भात एवढा होता की त्यात खड्डा करून कालवण रहाणे शक्य नव्हते. तिला परत हसू फूटले. माशांचे दोन तीन तुकडे तिने भातावर टाकले आणि लाकडी डाव व भांडे माझ्या पुढयातच ठेवून ती आपल्या जागी गेली. पण जेवण सुरू करायच्या ऐवजी सारखी हसत सुटली होती.

माझ्या मनात आता विचार आला. सुख, दुःख असे यांना काय माहीतच नसेल? तो मासे मारून आणतो, ही जेवण करून वाढते. आई आणि मुलगी घरामागच्या जमिनीत मिरच्या हळद लावतात. गरजा अशा काहीच नाहीत. लाज राखण्या पुरते कपडे डोक्यावर केंबळयाचे गळके छप्पर. खालून वाहणारी नदी. आणि पसरलेल्या जंगलातली मोकळी हवा. भरपूर भात आणि माशाचे कालवण दुसरा प्रकारच खातात की नाही? पण अतिशय हसरे, खळखळत जगणारे कुटुंब.

“नाव काय तुमचे?” माझ्या तोंडून त्याला विचारले गेले.

“शिवू! शिवू नाव पण हितले माणसं शिवडया ठाकर म्हणतात. ही माझी पोरगी सकू. आनी ही घरवाली शेवती.” तो जेवता जेवता थांबून नावे सांगू लागला. सांगून संपले तसे भाताचा एक गोळा बनवून त्याने तोंडात कोंबला. तो एवढा मोठा घास होता की तसल्या दोन घासात मी घेतलेला भात संपला असता. मनात ठरवले उद्या येताना आपण तिघांचे जेवण आणायचे.

जेवण संपले तसे शिवू उठला आणि परत आपले सामान घेऊन नदीकडे निघाला. आता ऊन पडले होते. चुकार एकादाच ढग आकाशात दिसत होता. मी कॅनव्हास स्टँड सकट पडवीकडे सरकवला. पडवीच्या पारीवर बसून चित्रात रंग भरायचे ठरवले. त्या दोघी आता त्यांच्या कामाची लगबग करू लागल्या होत्या. दोघीही तांदूळ निवडायला बसल्या होत्या. हळू आवाजात त्यांची कुजबुज सुरू झाली. मी हळू हळू माझ्या चित्रात दंग होत गेलो. आजुबाजूचे भान, कोणाचेही अस्तित्व विसरून एक एका रेखाटनाला जीवंत करायच्या मागे लागलो होतो. किती वेळ गेला कोण जाणे. मी शेवताच्या चेहेऱ्यावर काम करताना थोडा संभ्रमीत झालो. सहज म्हटले, “शेवता जरा इकडे येऊन उभी रहा माझ्या समोर.” कसलाच प्रतिसाद मिळाला नाही म्हणून वळलो तर दोघीही गायब झाल्या होत्या. मी शेवताच्या चित्राला रंग भरायच्या ऐवजी शिवूच्या चित्रावर काम करू लागलो. दिवस उतरत होता. चार एक वाजले असतील आणि नदी कडून शिवू, शेवता व सखू बोलत हसत येताना दिसल्या. शिवूच्या हातात आज काळ्या माशांच्या आठ दहा माळा दिसत होत्या. तो खूष होता. शेजारच्या गांवी जाऊन तो ते मासे विकणार होता. येताना मिरची, मीठ असले सामान घेऊन येणार होता. नदीत काळे मासे बुडून पकडावे लागतात. त्यासाठी श्वास भरपूर सांठवून बुडावे लागते. हा व्यायाम त्याचे शरीर डौलदार करीत होता.

संध्याकाळ होत आली. स्टँड पडवी जवळ ठेवून मी म्हणालो “उद्या येईन तो पर्यंत हा स्टँड इथेच ठेवला तर चालेल ना?”

“ठेवा! ठेवा! काय पण होवचा नाय. मी बगेन त्याला.” शिवू.

सगळे सामान एकत्र करून मी कँपकडे निघालो. त्याच्या बरोबर विरुद्ध दिशेला शिवू निघून गेला होता.

चालताना एकच विचार होता. कॅनव्हासवर हे तिघेही जीवंत करायचे. अगदी राजा रविवर्मा करतो तसे. एकही मॉडर्न फराटा नाही की भडक रंग संगती नाही. ते त्यांची झोपडी, आजूबाजूचा थोडासा परीसर एवढेच रंगवायचे जसे आहे तसेच. पण हे तिघेमात्र एकदम् जीवंत वाटले पाहिजेत त्यांच्या दारिद्र्या सकट पण खळखळत्या आनंदी आयुष्यासकट.

पहिल्यांदाच एक आव्हान मीच मला देऊन बसलो होतो. कँपवर पोचलो तर कुणीच आले नव्हते सुर्य अजून बराच वर होता. एक आळस देऊन आडवा झालो. डोळ्यासमोर सखू आली. नदीवरून परत येतानाचे तिघेही परत नजरे समोर आले. त्या बहुदा नदीवर आंघोळ करून आल्या होत्या. ओले केस दोघानाही सुटे सोडले होते. सावळ्या चेहऱ्यावर खळखळणारे हंसू होते, त्यांतून पांढऱ्या शुभ्र दंतपंक्ति चमकत होत्या. ते हसू, ती चाल, ते त्यातून प्रतित होणारे त्यांचे सुहृद संबंध, मागे उतारावरचा हिरवागार निसर्ग आणि खालून वहाणारी नदी. पूर्ण देखावा नजरे समोर ठाकला. हे ही एक चित्र सुंदर काढता आले असते हा विचार मनात आला न आला आणि एक नविन कॅनव्हास काढून मी रेखाटू लागलो. भान हरपून काम करत होतो. आता काळोख पडू लागला होता. बॅगेतून बॅटरीचा लँटर्न काढून मी चित्र पुरे करायचा, कमीत कमी रेखाटून ठेवायचा निश्चय करून बसलो होतो. मनःपटलावर उमटलेले ते दृष्य जसेच्या तसे उतरवत होतो.

“काय रे केव्हा आलास? आणि हे काय दोन दिवसात हे एवढेच काम केलेस? अजून रेखाचित्रच रंग केव्हा भरणार?” नुकत्याच परतलेल्या सुरेशने प्रश्न केला होता. मी सामान गोळा करता करता म्हणालो,

“मनात चित्र विषय तयार व्हायलाच वेळ लागला रे. पण एक झालेच. मी एकच नाही. सात आठ चित्रांची एक मालीकाच करीन म्हणतो. विषय तसाच आहे.”

“अरे काय या जंगलातच राहायचा विचार आहे काय?”

“पाहू रे! एकदा मनात चित्र साठवले की इथे काय आणि घरच्या स्टुडीओत काय, कुठेही पुरे करता येईल. माझ्या चित्रात विषयातल्या मुख्य ठिकाणानाच मी इथे चित्रीत करणार आहे.”

“अरे निसर्ग चित्रणासाठी आलो आहोत आपण. त्यात मालीका करण्यासारखा कसला विषय मिळणार?”

मी काहीच उत्तर दिले नाही. गप्पच राहिलो. रात्रभर त्यांचे ते नदीवरून परतणे डोळ्यांसमोर येत होते. रंग, रूप, अदा, कपडे, खिदळणे, खांद्यावरचे धुतल्या कापडांचे पिळे सगळे सगळे चित्रपटासारखे समोर दिसत होते. शिवूचा लंगोटीतला शाळीग्रामी अवतार, हातातल्या काळ्या माशांच्या माळा. सर्वच मनावर प्रतिबिंबासारखे उमटत होते गडद होत होते. माझ्यातला चित्रकार त्या सर्वांना मनाच्या कॅनव्हासवर गडद करत होता.

आधीही मी खूप चित्रे काढली होती. पण आत्ताची मन:स्थिती फारच वेगळी होती. हे तिघेही त्यांच्या निर्व्याज वागण्यामुळे आणि बांधेसूद शरीरामुळे निसर्गाचाच एक भाग वाटत होते. लज्जा

रक्षणापुरते कपडे, मोडके तोडके असले तरी शिरावर एक छप्पर, भरपूर मासे आणि भाताचा आहार. बाकी काही गरजाच नव्हत्या. आकांक्षाही नव्हता. जे त्यांच्याकडे होते त्यात ते सुखी होते. राग, अहंकार, भांडण गेल्या दोन दिवसात मला जराही दृष्टीला पडले नव्हते. असल्या नकारात्मक प्रसंगाना त्यांच्या आयुष्यात स्थानच नव्हते असे वाटू लागले. हे नकारे विचार नसल्या मुळेच बहुदा ते असे सुदृढ दिसत असावेत.

पण हे सर्व चित्रात कसे दाखवणार? त्यांचे सुख, हास्य, डौलदार शरीर, त्यांची चंद्रमौळी झोपडी, आजूबाजूचा परिसर सर्व काही चित्रीत करता आले असते. पण त्यांचे गुण कसे चित्रीत करायचे? हा भुंगा मनात फिरू लागला. पहाटे केव्हा डोळा लागला समजले नाही. सकाळ केव्हाच झाली होती. उन्हे फांकली होती. गडबडीने उठलो. कालचे सर्व सामान तसेच होते. ते उचलले. कपडे टॉवेल घेतले. आज पहिले नदीवर स्नान करून मगच चित्र रंगवायला घ्यायचे ठरवून निघालो. पहिला मोर्चा जवळच्याच एका तालुक्याच्या शहराकडे वळवला. एका हॉटेलपाशी आठ दहा गोल पाव व सहा आमलेट बनवून घेतली. बटरचे एक पॅकेट घेऊन मग परत जंगलाकडे निघालो. एक दीड तासाच्या पायपीटी नंतर त्या घराकडे पोहोचलो. सर्व काही सामसूम होते.

खाकरून पाहिले तरी काहीच हालचाल दिसली नाही. कुठे गेले हे लोक? असू दे! कामे असतील त्यांची. असा विचार करून मी सामान भिंतीवरच्या खुंटीला अडकवले. दुसऱ्या खुंटीला पाव ऑमलेटची पिशवी अडकवून नदीकडे निघालो.

नदी वरून जरी जवळ दिसत होती तरी पाऊलवाट फारच वळणे घेत खाली गेली होती. शेवटीतर तोल सावरता येवू नये एवढा ढाळ आला. घसरतच खाली खडकाळ सुक्या पात्रात उतरलो.

नदीला पुढे भरपूर पाणी होते. पाण्यात शिरणार तो सहज वरच्या पात्राकडे नजर गेली. तिथे बहुदा शिवू मासेमारी करीत असावा असे वाटले. खोलपाण्यात बुडी मारत होता. थोडया वेळातच पाण्याबाहेर डोके काढत होता. परत आत जात होता.

मी कंबरभर पाण्यात शिरून एक दोन डुबक्या मारल्या. पावसाळ्या नंतरची कोकणातली नदी ती. पाणी जरी निवळले होते तरी जोरात वहात होते. ओढही भरपूर होती. प्रवाहात पुढे जाण्याची हिम्मत होत नव्हती. तेवढयाच पाण्यात स्नान आटोपून मी पाण्याबाहेर आलो. अंग कोरडे करून मी कपडे करत होतो एवढयात मागून आवाज आला.

"भाऊ? आंघोळीला आलात? मी बघीतलय तुमाला. आणि आलो बघा." हातात तीन मोठे मासे घेऊन शिवू उभा होता.

"अरे वा! आज तीन मासे मिळाले? मग मेजवानी वाटते?" मी सहज बोललो.

"नाय वो! एक पुरेल आपल्याला. दोन बाजारात विकन. मळव्यांच्या माळां बरोबर. खडस आहेत. चांगले पैके मिळतील. एक वीसा तरी मिळेल." शिवू.

एक वीसा? मला काही समजले नाही. गप्पच बसलो. त्याने एक मासा "आपल्याला" पुरेल म्हटलेले ऐकले आणि खरोखर बरे वाटले. मला आता त्याने आपल्यालाच एक समजून जेवणासाठी गृहीत धरले होते. "अतिथी देवो भव." चा तो नैसर्गीक आविष्कार होता. आपपर भाव, स्वार्थ काहीच त्यांना शिवत नव्हते.

घरी पोचलो तर डोक्यावर पिशव्या घेऊन मायलेकी झपझप चालत येताना दिसल्या.

पाऊल वाटेने डोक्यावर पिशवी व दोन्ही हात बाजूला फलकवत, ठुमकत, त्या दोघी चालत होत्या. त्यांची ती लय. डोक्यावरची पिशवी सांभाळायला प्रत्येक पावला बरोबर कलणारी मान. कंबरेची लचक. ते चालणे नव्हते. चित्रकाराला अजून एक आव्हान वाटत होते. मी एकटक पहात राहिलो डोळ्यांत ते साठवत उभा होतो. त्या अंगणात आल्या. दोघेही मंद हसल्या. आता शिवू पडवीत चढला. त्या पडवी जवळ येताच सखुच्या डोक्यावरील पिशवी त्याने उचलली व खाली ठेवली. मग शेवताच्याही डोक्यावरची पिशवी त्याने उतरवली. सखू पाणी घेऊन आली. पाण्याचा लोटा तोंडावर घेऊन शेवता पाणी तोंडात ओतत धटधट आवाज करीत प्याली. मग सखूही प्याली. एक धडपड दिसली प्रत्येकजण एकमेकांची सहज काळजी घेत होता. कोणी काही न सांगता न मागता शिवूने पिशव्या उतरायला मदत केली, तर सखूने तहानलेल्या आईला पहिले पाणी दिले मगच ती प्याली.

"दोन वीसा घेतल्या रासनवाल्याने. एक वीसा नी धा व्हायचे ना हो? दोन वीसा दे म्हणाला म्हागाय झाली म्हणाला." शेवता

"अरे आता काय करूचा? धा दरवख्ते जास्त लागले तर मला पाच गाथणी जास्त न्यायला पायजेल दररोज. माशाला पैशे देत नायत. ते तर तेवडेच देतत." शिवू

"तू पण गाथणीचो भाव वाढव." शेवता.

हूं करून शिवू गप्प झाला. मी मधेच विचारले.

“शिवू हा मोठा मासा विकून तू किती पैसे मिळवतोस”

“माशे असतील तर एक वीसा देतत लोक. आणि पाच गाथणीचे धा देतत. रोज पांच गाथणी आणि एक नायतर दोन खडस नेतय बघा. म्हंजे किती मिळतत बघा. पुरतत तेवढे. तांदूळ, मीठ आणि मिरची एवढाच लागता विकत घ्यायला. बाकी सगळा रान देता. पैका नदी देते.” शिवू.

“तू बकऱ्या, कोंबडया का पाळत नाहीस?” मी

“नको भाऊ. त्यांना खाटीक मारतात कोणाला घरात पाळून माया लावाची, आन् मग कापायची? पाप ते. भैरवनाथ सुकी नाय करायचा.” शिवू

मी पुढे काहीच बोललो नाही. त्याचे मासे मारून विकणे हे पाप नव्हते. पण बकऱ्या, कोंबडी मारणे पाप ठरत होते. का विचारावे वाटले पण मनात भिती नाटली. त्याला दोन्ही गोष्टीत सारखेच पाप आहे याची जाणीव दिली आणि त्याने मासेमारी थांबवली तर खाईल काय? मनाशी खूणगाठ बांधली. यापुढे त्यांच्या आयुष्यात ढवळाढवळ करायची नाही. ते कसे राहातात, कसे वागतात हे बघायचे आणि त्यांना चित्रीत करायचे.

मी एक चित्र काढून झाले होते. रंगच नीट भरायचे होते. दुसरे नारळ फोडतानाचे, ते नदीवरून परत येतानाचे एवढे रेखाटून झाले होते. आता त्या डोक्यावरून पिशव्या घेऊन चालतानाचे दृष्य मनावर कोरले गेले होते. मधेच साधे मासे भाताचे जेवण मेजवानीसारखे जेवतानाचेही चित्र मनात जीवंत होत होते.

मी सरळ स्टँड उचलला अंगणात उभा केला. खुंटीवरून सामान काढले. नवा कॅनव्हास काढला. पुढचे दोन तास त्यांच्याकडे लक्षही न देता मी रेखाटत बसलो. अगदी समाधी लागल्या सारखा. कॅनव्हास वर त्या डोक्यावर पिशव्या घेऊन चालत येताहेत हे रेखाटून झाले. आता त्या आल्या त्या दिशेच्या निसर्ग त्यांच्या भोवती सजवू लागलो कधी रंग तर कधी रेखाटणे. मनाजोगते झाले तसे बाजूला ठेवले. ऊन चांगलेच लागत होते याची जाणीव झाली. तहानही लागली होती. पडवी जवळ आलो तर तिथे भरलेला लोटा वर मातीची पणती ठेवून झाकलेला दिसला. बहुदा माझ्यासाठीच तो ठेवला असावा तरीही मी हांक मारली “सखू?”

“सखू नाय! मिरच्या आणायला परसात गेलीय. काय पायजे काय भाऊ?” आतून शेवताचा आवाज आला. शिवू कुठे गायब दिसत होता.

“काही नाही पाणी पायजे होते. या लोट्यातले घेऊ?”

“वो! तुमच्याच साठी ठेवलाव. उनात उबे तान लागात म्हणून सखूने पाणी ठेवलान. मग परसात गेलीय. प्या तुमी.”

मी लोटा तोंडावर पकडून शेवता सारखा वरून प्यायचा प्रयत्न केला. थोडे पाणी छाती पोटावर तर थोडे नाका तोंडावर घरंगळले. ठसका लागेल, हे आपले काम नाही असा सरळ विचार करीत लोटा तोंडाला लावला.

समोरून शिवू येताना दिसला. जंगलातून सुकी तुटून पडलेली लाकडे गोळा करून त्याचा भारा डोक्यावर सावरत जरा उड्या मारल्यासारखा चालत येत होता. भारा बहुदा फार जड होता. त्याचा जडपणा सुसह्य करण्यासाठी तो उडी सारख्या दुडक्या चालीने एका लयीत घरा पर्यंत पोचला. भारा पडवीत टाकून हुश्श करीत बसतो न बसतो तोच शेवता पाणी घेऊन आली. लोटा खाली ठेवत म्हणाली. “खूप लाकडा आणलात जड असतीत ना?”

“होय! होय! पावसान भिजलीत म्हणून जड. नायतर झडलेल्योच फांद्यो हैत. एकय तोडली नाय. मॉप हैत. परत गेल्यार आणीन.”

“कशाक ती? हीच चलतील चार पांच दिस.” शेवता.

मी त्याची चाल, डोक्यावरचा भारा, लंगोटीच्या कपड्याचे चाली बरोबर होणारे हेलकावे, पायाच्या पोटऱ्यांच्या स्नायुंच्या होणाऱ्या हालचाली टिपल्या होत्या. त्या मनात घोळवत होतो. एका पायावर भार दिला की स्नायु ठरठरीत खेचलेले दिसायचे आणि उचललेल्या पायाचे स्नायु शिथील झालेले दिसत होते. दरवेळी त्याची लंगोटी जोर पडलेल्या पायाकडे झुकत होती. प्रत्येक पावलाबरोबर हेलकावे खात होती. दुडक्या चालीच्या लयी बरोबर लंगोटीच्या लोंबत्या फडक्याने पण समा साधली होती. चित्र कसे मनावर ठसठशीत उमटले होते.

अशी चित्रे भराभर उमटत गेली तर किती आणि कशी काढायची? हा प्रश्न आता मला सतवू लागला. हे तिघेही माझ्यातल्या चित्रकाराला दररोज आव्हान देत होते.

मग ठरवले एक एकाचे पूर्ण चित्र बनवायचे. निरनिराळ्या पोझेसमधे बनवायचे आणि प्रत्येक सबजेक्टीव चित्रविषयात त्याचा वापर करायचा. असे केले तर त्यांच्यावर कितीतरी चित्र विषय आपण घरच्या स्टुडिओत चित्रीत करू शकतो. एक चित्र मालीकाच तयार होऊ शकते. हा विचार पक्का केला.

झालेल्या कामावर एकदा नजर फिरवली. पहिल्या चित्रात रंगवलेल्या सखूची सगळी फिचर्स अगदी हुबेहुब ठसठशीत पणे दिसत होती. शेवताची देखिल. तिचा चेहरा व अंगकाठी सुंदर आली होती. शिवूला परत चित्रावा लागेल तेवढेच. शिवू समोरुन, उजव्या आणि डाव्या बाजूने रेखाटणे करून त्याचा एक संपूर्ण पोर्ट्रेट बनवला तर माझे काम होण्यासारखे होते.

मी तिघांचेही असे तीन बाजुनी पोर्ट्रेट करायचे ठरवले. शिवू दमून आला होता. म्हणून शेवताला विचारले.

“शेवता फार कामात आहेस? आता तुझे एकटीचे चित्र काढेन म्हणतो.”

“सखू! हय ये गो.” समोरून येणाऱ्या सखूला ती म्हणाली. सखू नेहमी प्रमाणे ओच्यात मिरच्या भरून आली होती.

“बघ! हे माजा फोटू काढूचा म्हणतायत. तू कालवण करशील? भात केलाय मी.” शेवता

“हां करतय जेवणाक वेळ आसा अजून करतय.” एवढे बोलून सखू घरात गेली.

मी शेवताला समोर पडवीच्या खांबाला टेकून उभी रहायला सांगीतले. ती तशीच खूप वेळ उभी रहाणे शक्य नव्हते हे मला चांगले माहीत होते पण मिळेल तसे काम लवकर करायचे ठरवून कॅनव्हास स्टँडवर चढवला.

रेखाटन सुरू केले. दहा पंधरा मिनीटे झाली असतील. ती तशीच चुळबुळत उभी रहात होती. मधुनच मी तिला सारखे पाय हलवू नको, पोज बदलू नको, हात होता तसा ठेव असल्या सूचना करीत होतो. ती हसत होती. परत मला पाहिजे तशी उभी रहात होती. मधुनच शिवूकडे पाहून हसत होती. मी सहज वळून शिवूकडे पाहिले. शिवू भिंतीला टेकून एकटक आमच्याकडे पहात होता. मी त्याच्याकडे पाहीले तसे म्हणाला, “केवा पुरा होईल फोटू?”

“उद्या संध्याकाळ पर्यंत होईल. मग तुझाही काढायचाय रहाशील ना उभा?”

“रातीला काढशाल? दिवसा नदीवर आणि माशे घेऊन बाजारात जायला लागंल. दिवसा येळ नाय होणार. रातीला काढा माजा फोटू. मी नदीवर नाय गेलो तर खायला काय मिळणार?”

“काळजी नको करूस, मी आजही तिघांसाठी जेवण आणलेय. सगळी चित्रे होत नाहीत तो पर्यंत मी आणीन जेवण सगळ्यांसाठी.”

“तुमी रांधतात काय सक्काळी?” शिवू.

हे ऐकून शेवता खुदूखुदू हसु लागली. मी तिला परत सारखी उभी करायचा प्रयत्न करीत होते. पण तिचे हसणे काही थांबत नव्हते. शेवटी कशीबशी उभी केली. हे कर्म कठीण होते.

एक समोरचे रेखाटन कसेबसे पुरे करून रंग जवळ घेतले आता तिचा चेहेरा रंग भरून हुबेहुब जीवंत करायचा ठरवले. मी रंगून गेलो. मधेच नजर वर करून पहायचो. तिने कधी उजवीकडे तर कधी डावीकडे मान वळवलेली असायची. मी तिला परत समोर. बघ म्हणून सांगत होतो. मगच ती समोर पहायची. चेहेऱ्याचे रंग असे काही भरले गेले की शेवता एकदम् जीवंत वाटू लागली. डावी आणि उजवी कडची उभी पोजही रेखाटून झाली. तो पर्यंत बराच वेळ झाला होता. मधेच पाहिले तर शिवू गायब होता. सखू आणि शेवता आत खुडबुडत होत्या. ताठरलेले अंग ढिले करायसाठी मी आळोखे पिळोखे दिले. मान ढिली करण्यासाठी फिरवली तर नदीकडून शिवू भरभर चालत येताना दिसला. हातामधे नेहमी प्रमाणे काळया माशांच्या गाथणी होत्या. येऊन पडवीत बसत म्हणाला.

“शेवता जेवक वाढ गो! भूक लागली. भाऊ तुमी पण या जेवा.” मलाही भूक लागली होती. मी तर सर्वांसाठी पाव आमलेट आणले होते. एकदम् म्हणालो, काय करतायत या दोघी? चला या मी सगळ्यांसाठी आणले आहे.

“काय आणलाय?” शिवू विचारात होता. तेवढ्यात शेवता भाताचे मडके आणि सखू कालवणाचे सोरकुल घेऊन बाहेर आल्या. परत जाऊन सखूने पाणी आणले. पंगत बसली. मी पावाच्या लाद्या काढून एका पानावर ठेवल्या. ऑमलेटची पुडी सोडून त्यांच्या पुढ्यात पसरली.

“काय हाय ह्या?” शेवता विचारू लागली. तेवढयात शिवूने एक पाव उचलून फोडला आणि तोंडाकडे नेला आणि तसाच परत खाली ठेवत म्हणालो.

“भाऊ! आंबलाय हो तुमचा जेवण. आंबूस वास येतोय खाव नुको.”

मी पाव उचलून पाहिला चांगला मऊशार ताजा होता. पावाला येतो तोच वास होता. तो फरमेंटेशनचा वास त्याला आंबलेल्या अन्ना सारखा वाटत होता. मी म्हणालो, “शिवू पाव ताजाच आहे. त्याला असाच वास असतो. खाऊन बघ. आणि हे अंड्याचे आमलेट आहे. पाव आणि आमलेट आम्ही तिकडे नेहमी आवडीने खातो.” मी एवढे बोलतोय तोवर सखूने आपल्या पानात घेतलेले आमलेट परत पुडीत टाकले. म्हणाली.

“कोंबडीचा अंडा नाय खात आमी. पोरा येतत त्यांतून. फोडू नये कोणाचाय अंडा. पाप ता.”

मी पहातच बसलो. त्यांनी भात आणि कालवणच खायला घेतले. मग मलाही लाज वाटली. सर्व गुंडाळून ठेवून मी म्हणालो.,

“सखू मलाही भात आणि कालवण दे.”

“आता कसा! गरम रांधलेला खावचा. रोग लागत नाय. थंड शिळा पाका खाव नये.” शेवता.

त्यांची साधी रहाणी तर होतीच पण विचार सुद्धा स्पष्ट होते. ऐवढेच नाही तर ते भक्तिभावाने पाळत होते. गरम ताजा भात, माशांचे कालवण नावाचे वर घातलेले आंबट तिखट पाणी, नदीत डुंबण्याचा व्यायाम, आणि जंगलातील स्वच्छ हवा तशीच निर्मळ मनं यानीच त्यांची शरीरे अशी सुबक मुर्तींसारखी बनली असावीत.

जेवण संपले. सखुने सर्व आवरले. मी माझ्या कामाला लागलो. तासभर गेला असेल. आणि सखूचे बोलणे कानावर आले.

“बाबा निघालास? आमी पण येताव नदीवर.”

“चला तर लवकर दिवस उतरला, पाणी थंड झाला तर मासे गावचे नाय. उबदार पाण्यात खडकाच्या सावलीत. दबून रवतत ते पटापट पकडूक येतत. चला लवकर.” शिवू त्यांना सागत होता.

“भाऊ! तुमी पण चला. न्हालात तुमी? नायतर न्हावन घ्या.” शेवता. बाहेर येत म्हणाली.

मनात विचार आला. चला जाऊ आपण पण. चित्रासाठी नवे काहीतरी मिळेल. आणि तसेच झाले.

नदीवर पोचलो आणि शिवू लांब खोल पाण्याकडे मासे पकडायला गेला. त्या दोघी अंगावरच्या कपडयानिशी पाण्यात शिरल्या. त्यांना माझे अस्तित्व जराही खटकले नाही याचे मला आश्चर्य वाटले. मी एका झुडपाच्या अर्धवट सावलीत उनापासून स्वतःला वाचवीत बसलो.

सखू आणि शेवता आता रंगात येऊन डुंबत होत्या एकमेकांवर पाणी उडवत होत्या. मधेच पाण्याखाली जाऊन दिसेनाशा होत होत्या. वर आल्या की खिदळत होत्या. मधेच पोहत पकडापकडी खेळत होत्या.

एक एक चित्र डोळ्यासमोर जीवंत प्रकट होत होते. क्षणार्धात बदलत होते. मनाच्या कॅनव्हासवर पकडता येत नव्हते. रेखाटले असते तरी डिटेलींग कसे करणार होतो? क्षणभर दिसणारे ते दृष्य कसे टिपून ठेवू? त्यांच्या केसांच्या चिंब झालेल्या बटांचा चेहऱ्यावर चाललेला खेळ टिपू की पाण्याच्या शिंतोड्यानी केसात आणि चेहेऱ्यावर केलेली आरास टिपू? जेव्हा कंबरभर पाण्यात उभ्या रहात तेव्हाचे त्यांच्या शरीरा वरून ओधळणाऱ्या पाण्याच्या धारा मनावर कोरू की अपुऱ्या आणि शरीरावर घट्ट चिकटलेल्या कपड्यातून ओसंडणारे सौंदर्य टिपू?

अरेरे कॅमेरा आणला पाहिजे होता. कित्येक फोटोत जे मनावर कोरता येत नाही ते कॅमेऱ्याने टिपले असते. मागाहून चित्र काढताना ते रेफरन्स म्हणून वापरता आले असते.

एकाच वेळी मी ती डुंबणारी, हंसणारी, खेळणारी रानपाखरे पहाताना आनंदीतही होत होतो, चुकचुकतही होतो. अधीर होत होतो. हे सर्व कॅनव्हासवर कसे प्रतिबिंबीत करता येईल या विचाराने अस्वस्थ होत होतो.

एवढयात शिवू एक मोठा मासा पकडून त्यांच्या जवळ आला. माशाला कल्ल्यातून बोटे घालून त्याने घट्ट पकडले होते. मधेच त्याला तो पाण्याबाहेर काढत होता. मासा जिवंत होता. पाण्याबाहेर तो फडफडायचा मग शिवू त्याला पाण्यात बुडवायचा. आता तो शेवता आणि सखू जवळ आला. दोन्ही बाजूचे कल्ले पकडून त्याने माशाला दोघींच्या मधे पकडले आणि पाण्याबाहेर उचलून धरले. माशाने शेपटी एवढया जोर जोरात हलवायला सुरवात केली की त्याने शेवताला आणि सखूला शेपटीचा एक एक तडाखा बसला. त्या हंसत किंचाळल्या. मग हा त्या तिघांचा खेळ छान रंगला.

अनिमिष नेत्रानी मी त्यांचा हा आनंद पहात होतो, पीत होतो. निर्मळ आनंद काय असतो ते समोर दिसत होते. हा चित्रविषय तर जबरदस्त होता. नदीवर आल्यापासून माझ्या समोर या तिघानी चित्र विषयांची रास केली होती. काय काय म्हणून आठवणीत ठेवू? काय काय रेखाटता येईल? आठवणीत ठेवलेल्या प्रतिबिंबा वरून डिटेलिंग करता येईल? कितीतरी प्रश्न मनात डोकावून जात होते.

एवढयात ते तिघेही ओरडू लागले. इकडे तिकडे पळू लागले. शिवूच्या हातून मासा सुटला होता. त्याने खोल पाण्यात जाऊ नये म्हणून त्याला उथळ पाण्याकडे ते हाकलायचा प्रयत्न करीत होते. पण माशाने त्यांना हूल दिलीच. सखूच्या शेजारून तिच्या हातावरून उडी मारून त्याने खोल पाण्याकडे सूर मारला.

क्षणभर तिघेही शांत होऊन मासा गेला तिकडे पहात होते. मग एकदम जोरजोराने हंसत तिघे तो खेळ आनंदाने उपभोगीत होते. निखळ आनंद आयुष्यात जो मिळावा म्हणून प्रत्येक जण धडपडतो तो आनंद ती तीन रानपांखरे अक्षरशः लुटत होती. समृद्ध होत होती. दारिद्रय हा त्यांना श्राप होता की वर?

एवढयात शिवूने झोपडीकडे बोट दाखवत त्या दोघीना काहीतरी सांगीतले व स्वतः एक जोरदार सूर मारून खोल पाण्याकडे निघाला. त्या दोघी आता पाण्यातून बाहेर येत होत्या. पाण्याने निथळणाऱ्या त्या माझ्या समोरच आल्या. बापरे काय अप्रतिम शिल्प डोळयासमोर उभे झाले होते.

त्यांच्या डोक्यावरून घरंगळणारे थेंब सूर्यकिरणानी चमकत होते. काहीतून प्रकाश जाताना तांबडे, हिरवे, जांभळे किरण परावर्तीत करत होता. केस चेहेऱ्यावर घट्ट चिकटून बसले होते. खाली लोंबणाऱ्या बटातून पाणी निथळत होते. साडीच्या लोंबत्या भागातून पाण्याची हळूवार धार पडत होती.

तर काहीतून थेंब ठिबकत होते. तेही सूर्य किरणानी वेगवेगळ्या रंगात चमकत होते. नाकावर, कानाच्या पाळ्यांवर, गालांवर स्थिरपणे ठाण मांडून बसलेले थेंबही तसेच चमकत होते.

अजंठा लेणयांमधली ती कृष्णअप्सरा काहीच नव्हती असे ते दृष्य होते. माझ्या समोर दोन कृष्णअप्सरा पूर्ण मोती, हिरे पाचू यांनी मढलेल्या दिसत होत्या. फक्त कान नाकातच नाही तर यांच्या साडया कपडयाना देखिल सर्व रत्ने मढवल्यासारखे वाटत होते. कोण होत्या या? अप्सरा की देवी? आता त्यांनी आपल्याला कोरडे करायचे ठरवले होते.

डोक्यापासून पायापर्यंत हात फिरवत त्यानी पाणी निथळवून टाकले होते. ते झाल्यावर पदर बाजूला करून वाऱ्यावर सुकवायला धरला. फडफडणारा तो पदर साडीची जीर्णावस्था पुरी उघडी करीत होता. नदी आणि आकाशाच्या कॅनव्हास वर एक अप्रतिम शरीर सौष्ठवाच्या मुर्ती मला आपले चित्र काढायचे आव्हान देत होत्या. तो फडफडणारा पदर, कमरे खालील शरीराला चिकटलेली साडी. एक पाय मुडपून आणि एका हाताने लांब पकडलेला पदर त्यांतून दिसणारे प्रमाणबद्ध कृष्ण सौदंर्य. सुर्य किरणानी चमकणारे केस आणि आता भुरभुरणाऱ्या, सुकलेल्या काही बटा. त्यांच्याकडे नक्की काय होते? दारिद्रय की शरीर सौष्ठवाचा, आनंदाचा, समाधानाचा, सुस्वभावाचा खजीना?

त्यांच्या आहारात भात आणि मासे हे एकच जेवण दोन्ही वेळी जेवले जायचे. तेही गरम गरम ताजे बनवून. दुसऱ्या खाण्याला त्यांच्या आयुष्यात स्थानही नव्हते. त्यांनी त्यांची खाण्यापिण्याची गरज वाढवलीच नव्हती. अठरा विश्वे दारिद्र दाखवणाऱ्या त्या साड्या, कपड्यातही ते खूष होते. चंद्रमौळी झोपडीत आनंदाने झोपत होते. पाण्यात डुंबत होते. नदीकांठावर पोहत होते. निर्मळ मनाने माझ्या समोर साड्या वाळवताना संकोचतही नव्हते. कदाचित नजरेने लज्जाहोम होईल या संस्कृतीतले ते नव्हते काय? कारण आता शेवताने चोळी काढून वाऱ्यावर धरली होती. सखूनेही चोळी काढायला सुरवात केली होती. मी अस्वस्थ झालो होतो. नजर एका क्षणी त्यांच्यावरून दूर जात होती. शहरात असे चित्र आशाळभूत पणे न्याहाळणारे लोक शंभर टक्के मिळाले असते. पण त्यांच्या मोकळ्या आणि नैसर्गीक वागण्याचा मनावर असा काही खोल परिणाम झाला होता की त्यांना त्या नजरेने न्याहाळणे म्हणजे एकाद्या शिल्पावर घणाघात घालण्यासारखे ठरले असते.

पण चित्रकार स्वस्थ बसू देत नव्हता. एका हाताने पसरलेला तो पदर दुसऱ्या हातात वाऱ्यावर फडफडणारी ती चोळी, मुडपलेले पाय ही त्यांची पाठमोरी पोज आता आणखी एका चित्राचे आव्हान करीत होती. मधेच एकमेकीशी बोलताना त्या वळत तेंव्हा त्या साडीमागे दिसणारी अर्धनग्न आकृती हा ही एक आव्हान देणारा चित्र विषय होता.

आता मात्र मी मनाची समजूत घातली. चित्र विषय म्हणून पहात त्यांना त्या स्थितीत मनावर कोरून ठेवायचे. हे दृष्य अत्यंत दुर्मीळ आहे. मग एकटक त्यांच्याकडे पहात सर्व मनावर कोरू लागलो. गुंग झालो पण धुंद होण्यापासून स्वतःला सांवरले. आता चित्रकार म्हणूनच मी त्यांच्याकडे पहात होतो. मनात सांठवीत होतो. कितीही पाहिले तरी हे आव्हान एवढे जबरदस्त होते की स्टुडीओत बसून काढताना नक्कीच कित्येक डिटेल्स बदलली असती. कॅमेरा पाहिजेच होता. फोटोवरून एकादा रेफरन्स घेता आला असता. कॅमेरा तंबूत ठेवून आलोच का मी? स्वतःलाच दोष देऊ लागलो.

त्यांनी चोळया चढवल्या आणि पदर घेतला. त्यांचे निथेळणेही बंद झाले होते. हळू हळू त्या घराच्या दिशेने निघाल्या.

“चला भाऊ! घरी चला. एकटेच कशाला बसताव.” शेवता

“शिवू येवू दे!” मी

“ते नाय येवचे. मासे पकडत बसतील तासभर तरी.” मी उठलो आणि त्यांच्या बरोबर चालू लागलो. घरी पोचता पोचता मनात आले. आज लवकर निघून बाजारात जाऊ आणि या लोकांसाठी साड्या, धोतर घेऊन येवू. नाहीतरी मी त्यांना फुकट मॉडेल म्हणून वापरत होतो.

चुकार ढग मधून मधून सूर्यावर येत होते. ऊन सावलीचा. खेळ चालला होता. हवाही तशी थंडच होती. घरी येताच मी सामान एकत्र केले. स्टँड व्यवस्थित एका बाजूला उभा केला आणि म्हणालो,

“उद्याचा शेवटचा दिवस मग मी जाणार. थोडी खरेदी करायची आहे म्हणून लवकर जातोय. पण शिवूला सांगा उद्या मी येई पर्यंत कुठे जाऊ नको. मी येईन तेव्हा तिघेही इथेच असायला पाहिजेत. अजून चित्रे काढायची आहेत मला.”

“मग आता पर्यंत काढलेत ते?” शेवता

“त्याला पेंटींग म्हणतात. ती पेंटींग मोठे लोक आपल्या घरात लावतात.”

“आमचे फोटू? दुसऱ्यांच्या घरात? ते ओळखत पण नाय आमका.” शेवता.

मी बोलणे आटोपते घेतले. मनात भिती वाटली आमचे फोटो आम्हाला द्या म्हणाले तर. मी झटपट सामान उचलले त्यांचा घाईतच निरोप घेतला आणि शहराचा रस्ता पकडला.

शहरात पोचल्या पोचल्या फोटो स्टुडिओ गाठला. त्याच्याकडचे सेटअप पाहिले. तो आठ बाय दहा इंचा पर्यंतचे प्रिंट काढू शकत होता. त्याच्याकडे कॉंप्युटर कामचलाऊ होता. लहान शहरात याच्यापेक्षा जास्त काय मिळणार. मग ठरवले दुसऱ्या दिवशी दुपार पर्यंत होतील तेवढे फोटो काढायचे.

दुपारी स्टुडीओत येऊन प्रिंट काढायचे आणि शिवूच्या घरी जाऊन शिवूला द्यायचे. उद्या चित्रे रेखाटणे, रंगवणे बंद ठेवायचे.

मग बाजारात फिरून दोन साडया, परकर, ब्लाऊजपीस आणि एक धोतर घेतले. त्यांना भेट द्यायची ठरवली होती. चिकू, सफरचंद, डाळींब अशी फळे घेतली. कँपवर परतलो. आणि सर्व सामान एका बाजुला ठेवून आरामात पडलो. अजून कोणीच आले नव्हते.

डोळया समोरून सकाळपासुनची सगळी चित्रे सरकत होती. ही सगळी जीवंत करता आली असती तर? मी खरोखरच प्रसिद्ध चित्रकार होईन का? नजरे समोर ते प्रसंग आणून ते मनावर कोरून ठेवत होतो. किती वेळ गेला ते समजलेच नाही. सर्वजण आले. मिलींद, सुरेशनी आमलेट पावाची पिशवी पाहिली. आणि सरळ खायलाच बसले. मी उठलो. तोंडावर पाण्याचा हबका मारून फ्रेश होत त्यांच्याकडे आलो.

“काय रे अली, आज सगळ्यांसाठी आमलेट पाव घेऊन आलास का? किस खुशीमे?” मिलींदने विचारले.

“काही नाही रे शहरात गेलो होतो. थोडे काम होते. म्हटले आमलेट पाव घेऊन जाऊ. तेवढीच कँपवर दगदग कमी.” मी खरोखरचे कारण दडवून सारवासारव केली.

“चला उद्याचा शेवटचा दिवस. पण दिवस पुरले नाहीत. अजून दोन दिवस मिळाले असते तर माझे काम इथेच पुरे झाले असते.” सुरेश जरा हळहळत बोलला.

मी काहीच बोललो नाही. मनात विचार होता मला तर महिना देखिल कमी पडला असता. एका मागून एक चित्रविषय माझ्या समोर ठाकत होते. मी त्यांचे रेखाटन पण करून ठेवू शकत नव्हतो. दररोज नवाच देखावा ते तिघेही माझ्यासमोर उभा करीत आणि मी मोहून जाई. चित्रकाराला आव्हान देणारे ते प्रसंग परत नजरे समोर तरळून गेले.

जेवणे आटोपून सर्व तंबूच्या बाहेर बसलो. थंड झुळका आणि मंद चंद्रप्रकाशाने वातावरण सजले होते. सगळेच मूक बसून त्या वातावरणाचा आस्वाद घेत होते. एवढ्यात मला कॅमेऱ्याची आठवण झाली. बॅटरी, मेमरी चेक करून ठेवली पाहिजे. उठलो सर्वांचा फोटो काढायचे निमित्त करून कॅमेरा घेऊन आलो. त्या चंद्रप्रकाशात आमचे सर्वांचे चार पाच फोटो काढले. बॅटरी चांगलीच होती. मेमरीमधे सुद्धा २५०च्या वर फोटो अजून राहिले असते. त्यामुळे स्वस्थ झालो.

रात्री झोप येण्याचे नाव घेत नव्हती. सर्व प्रसंग डोळया पुढून सरकत होते. मग केव्हातरी झोप लागली. सकाळी लवकरच जाग आली. सामान गोळा करू लागलो. कॅमेरा, स्टँड, त्यांच्या साठी

घेतलेले कपडे, फळे, तीन नविन कॅनव्हास. पण आज कॅनव्हासची जरुरच काय? मग परत ठेवून दिले. पूर्वी रेखाटलेले सर्व कॅनव्हास बरोबर घेतले. खरे तर गरज नव्हती पण न जाणो केव्हाही कशाचीही गरज पडायला नको.

जेव्हा शिवूच्या घरी पोचलो तर पठ्ठ्या गायब. शेवता पडवीतच तांदूळ निवडत बसली होती. सखू अंगण झाडत होती.

"अरे शिवू कुठे आहे. सगळ्याना मी इथेच असायला हवे म्हणून सांगीतले होते ना?"

"येतील वो ते. ते नदीर गेलेत दुपारच्या कालवणाक ताजो मासो आणतत ना, तो आणूक गेलेत." शेवता.

मी सामान एका बाजूला ठेवले. सखूचे अंगण झाडून झाले होते, कॅमेरा स्टँडवर लावून अंगणाच्या एका कोपऱ्यात सेट केला. झूम करून पाहिला, चारी बाजूला फिरवून पाहीला. मनासारखा सेट होतो तोवर सखू म्हणाली "बाबा आलाव."

शिवू नेहमी प्रमाणे चार पाच गाथनी आणि दोन मोठे मासे घेऊन येत होता. मी कॅमेरा फिरवला आणि एक दोन स्नॅप झटकन घेतले. कोणालाच काही कळले नाही.

शिवू माझ्याकडे बघून हसला. शेवताकडे मासे देत म्हणाला, "तुमी म्हटलात ना येयन तेवा सगळे हाजर ऱ्हा. म्हणून लवकर जावन मासे घेवन आलय. आता नाय जायचा दुपारतवर."

मी सरळ माझ्या पिशव्यांकडे गेलो. पिशव्या उचलल्या आणि म्हणालो,

"शेवता, सखू इकडे या"

सखू आणि शेवता आल्या. बहुदा माझा आवाज हुकमी आणि मोठा आला होता असावा. फळांची पिशवी शेवताला दिली.

"जेवल्यावर ही फळे खाऊया चालेल ना?"

पिशवी उघडून पहात शेवता म्हणाली, "चिकू समजले, बाकी काय आसत ती नाय समजली."

"सांगेन मागाहून पिशवी ठेव. आणि इकडे ये." हातातली कपड्याची पिशवी पडवीच्याकडेवर ठेवत मी कॅमेऱ्याकडे गेलो.

"शेवता ती पिशवी आहे ना त्यात कपडे आहेत. पिवळी साडी आहे ती सखूसाठी, दुसरी आहे ती तुझ्यासाठी आणि धोतर शिवू साठी." मी हे सांगत होतो तो पर्यंत शेवताने पिशवी पडवीतच उपडी केली. साडी बरोबर घेतलेले लाल आणि पिवळे परकर व ब्लाऊज पीस देखिल पडवीत विखुरले. तिघेही दोन मिनीटे पहातच बसले. मग सखू पुढे झाली. पिवळी साडी उचलून पाहू लागली. दुसरी साडी शेवताने

हातात घेतली. शिवू पांढरे स्वच्छ धोतर घेऊन बाजूला गेला. तिघानी एकमेकांकडे पाहिले आणि एकदम हंसायला सुरवात केली. मी कॅमेऱ्यातून सगळे टीपत होतो. मला अंदाज होताच हे असेच काहीतरी करणार. कॅमेरा एका क्लिकवर चार पांच स्नॅप्स घेईल असाच लावला होता.

त्यांचे हसणे देखिल सर्वांगसुंदर होते. कधी कमरेत वाकून तर कधी एका बाजूला होत वेड्यासारखे हसत सुटले होते. हा कपडे मिळाल्याचा आनंद होता की ती माझी भेट त्यांना विचित्र वाटली होती, हेच समजत नव्हते. एवढयात सखूने पिवळा परकर कपड्यातून उचलला आणि घरात पळाली. शिवूने अंगणाच्या पारीवरचे दोन गुळगुळीत दगड उचलले आणि पडवीत आला. विस्कटून पसरलेल्या धोतराला पूर्ण सोडून त्याने त्याची दुमड घातली. मध्यभाग काढला आणि तो एका दगडावर ठेवून त्याची कडा दुसऱ्या दगडाने ठेवू लागला.

"अरे! अरे! फाटेल ते धोतर! काय करतोस हे?" मी जोरात विचारू लागलो.

"चार लंगोटी होतील वो या कापडाच्यो." शिवूने असे सांगत कडा फाटलेले धोतर मधेच टारकन फाडले. त्याचेही त्याने दोन भाग केले. आता मला समजत होते. हा ते धोतर म्हणून नेसणारच नव्हता. त्याच्या लंगोट्या बनवणार होता. चार तुकडे करून झाल्यावर त्यातला एक तुकडा उचलून त्याने त्याच्या नीऱ्या काढायला सुरवात केली. एवढयात सखू परकर नेसून बाहेर आली. पिवळा परकर वर जुनीच फाटकी चोळी. एक गिरकी घेऊन शेवताकडे पहात म्हणाली.

"आई कसा दिसतय मी?" परत एकदा दोघीही खिदळू लागल्या. शिवूने आता शांतपणे निऱ्या काढलेले धोतर जुन्या लंगोटाचा पुढचा भाग वर करून करदोट्यात अडकवायला सुरवात केली होती. गुडघ्याच्या थोडासा वर येईल एवढे धोतर पुढे खेचून त्याने पाय उचलून, दोन्ही पायातून धोतर मागे नेले त्याला पीळ घालून त्याने जुनी लंगोटी मागून करदोटयातून काढली. आणि नवी पीळ घातलेली लंगोटी करदोटयात घुसवली. घट्ट खेचून पुढे आणली. एका हाताने पुढे आणलेली लंगोटी पकडत, जुन्या लंगोटीचा पुढचा शेव खेचून त्याने ती जमिनीवर फेकली. नवा शेव करदोट्यात ओवत त्याने त्या कपड्याचे दोन्ही शेव सारखेच करत खेचून घेतले आणि पुढे त्यांना पसरवले. आता त्यांची नवी लंगोटी पुढचा बराचसा भाग दडवू लागली होती. तिने आपला विळखा त्याच्या कमरेवरून मागेपर्यंत नेला होता. लंगोटी अशी नेसून झाल्यावर टेचात मिरवत पुढे आला.

"कसो नवरदेव दिसतय बघ!" शेवताकडे पहात तो म्हणाला आणि परत हंसण्याचा, खिदळण्याचा स्त्रोत सुरू झाला.

मी कॅमेरा कितीतरी वेळा क्लिक करीत बसलो होतो. फ्रेम कशी आहे याकडेही लक्ष नव्हते. तिघेही मावतील एवढाच कॅमेरा झूम केला होता. कोणीही फ्रेम मधून सुटू नये हे पहात होतो. सगळेच प्रसंग अप्रतिम चित्रविषयांची मालीका होती. हावरट पणाने मी सगळे कॅमेऱ्यात बंदीस्त करायला उतावळा झालो होतो.

बहुदा त्याने फाडलेल्या धोतराचे अनुकरण करीत सखुने आपल्या पिवळया साडीचे दोन तुकडे केले. एक तुकडा परकरावर खोचून शरीरा भोवती गुंडाळत तिने पदर घेतला. तो जरा जास्तच लांब झालेला बघून परत साडी खेचून काढली परत गुंडाळली. हे सर्व जमत नाही याची सुद्धा त्यांना मजा वाटून ते खिदळत होते. शेवटी शेवताने उठून तिचे पातळ मागे अडकवले. पाहिजे तेवढा पदर ठेवून बाकीच्यांच्या निऱ्या काढल्या आणि पुढे खोचून दिले.

आता सखू रंगात आली होती. हातात पदर पकडून फलकावीत ती धावू लागली पदर वाऱ्यावर उडवीत होती. ती एकदम उडी मारून अंगणात उतरली आणि नदीच्या दिशेने धावू लागली. माझी तारांबळ उडाली. कॅमेरा मी फिरवून तिला फ्रेममधे पकडली. पदर उडवीत नदीच्या दिशेने जाणाऱ्या उतारा वरचे तिचे कितीतरी स्नॅप्स टिपले गेले.

कॅमेरा परत पडवीकडे फिरवला. शिवूची काळी शाळीग्रामी मूर्ती त्या पांढऱ्या स्वच्छ लंगोटी मुळे उठून दिसत होती. शेवता सगळे कौतुकाने पहात होती. मी एकदम म्हणालो.

"शेवता तूच राहीलीस. तूही बदलून ये साडी."

"मी नाय बा. आत्ताच कशाला नटू? ही साडी सखूच्या लग्नासाठी ठेवीन." साडीवरून प्रेमाने हात फिरवत कुरवाळत ती बोलत होती.

"अग मग पिवळी साडी नेस, सखूसारखी. तिने नाहीतरी एकातून दोन केल्याच आहेत ना?"

"हो! ह्या बरा. नेसतय पिवळी साडी" असे म्हणत ती पटकरून उठली. लाल परकर आणि पिवळी साडी घेऊन घरात गेली. मी कॅमेरा सज्ज ठेवून होतो. पांचच मिनीटात ती सजून बाहेर आली. शिवूने तिच्याकडे पाहिले आणि तो जोर जोरात खिदळत तिच्याकडे पोचला. कमरेखाली तिला पकडून तिला एवढे वर उचलले की तिचे डोके कैंबळयाच्या छताला टेकले. एक गिरकी घेत त्याने तिला खाली उतरवले. मी हा शृंगारोत्सव अनिमिष पणे न्याहाळत होतो. भरपूर फोटो घेत होतो. एवढयात सखूही परत धावत आली. या रानपांखराना आज नव्या कपड्यांची हवा लागली होती. ती आनंदाने बागडत होती. विहरत होती, तरंगत होती. निरनिराळे आनंदी भाव त्यांच्या सर्वांगातून उमटत होते आणि माझ्या कॅमेऱ्यात असंख्य चित्र विषय कैद होत होते.

आता नदीवरचा कालचा आंधोळीचा सीन मी यावरून तयार करू शकलो असतो. सूर्य बराच वर आला होता. घड्याळात पाहिले अकरा वाजून गेले होते.

"आलोच" एवढे बोलून मी कॅमेरा घेतला आणि शहराचा रस्ता पकडला. आठ दहा तरी चांगले फोटो प्रिंट घेऊन यावे व त्यांना द्यावेत असा विचार केला.

स्टुडिओवाल्याने झटपट काम केले. सखूचा धांवतानाचा फोटो, शिवूचा लंगोटी कसतानाचा फोटो, शिवूने शेवताला उचललेला फोटो, तिघेही कपडे पाहून खिदळतानाचा हे खूपच छान आले होते. तासाभराची पायपीट करत परत पोचलो. तोवर दोन वाजत आले होते. तहान भूक हरपून यात आता पर्यंत गढलो होतो. घरी पोचलो तर ते सगळे माझ्यासाठी जेवायचे थांबले होते.

"भाऊ किती वेळ भुका लागल्या आमाला" सखू

"सॉरी! सॉरी! हे तुम्हाला द्यायला आणलेत फोटो." असे म्हणून मी फोटो पाकीटातून काढले आणि त्यांच्या समोर पसरले. सगळे आपली प्रतिबिंबे पहात आनंदीत होते. एकमेकाना दाखवून त्यावर बोलत होते. मी त्याचेही काही फोटो घेतले.

आता मी देखिल भुकाळलो होतो. फोटो पहाण्यात ते एवढे दंग होते की त्यांची भूक हरपली होती. चांगला अर्धातास गेला आणि शेवताला जेवणाची आठवण झाली. तिने लगेचच जेवण मांडले. प्रत्येकासमोर कर्दळीच्या पानावर भाताचा डोंगर व त्यावर एक माशाचा तुकडा. कालवणाचे पाणी भातात जिरून भाताच्या शितांवर लाल मिरचीचे गंध लागलेले. भाताचे बाकी दाणे स्वच्छ पांढरे होते. किती साधे जेवण. दिवसामागून दिवस, महिनेन महिने, ते हेच जेवत होते. पण त्यामुळे जराही दुःखी होत नव्हते. विरलेले फाटके कपडे आनंदाने घालत होते. गरजा मनात बाळगतच नव्हते. नदीत पोहून, जगंलात फिरून, भात आणि मासे खात, केव्हा केव्हा रानफळे खाऊन देखिल ते एकाद्या कोरीव शिल्पासारखे दिसत होते.

निरागस, निर्मळ मने, रानवारा या वरची ही रानपांखरे जगाची पर्वा न करता आपल्याच विश्वात दंग होती. जीवनाचा आनंद पुरेपूर लुटीत होती. कसलीही हाव नाही. कोणाशी संपर्क नाही म्हणून भांडणतंटा हेवे दावे काहीच नाही. प्रत्येक जण आपले काम वाटून घेऊन करीत होता. छोट्या छोट्या गोष्टी हसून खिदळून साजऱ्या करीत होते. गरजेपुरतेच पैसे कमवून शिवा आणत होता. जास्त पैसे कमवण्या साठी जास्त मासे पकडत नव्हता. आजची गरज भागली की झाले. एवढयाच विश्वात ते समाधानी होते. हे सगळे मला चित्रातून दाखवता येईल? त्यांची जीवन शैली वेगवेगळया कॅनव्हास वर चित्रून एक सेरीज केली तर? तरी देखिल हे विश्व सर्वांसमोर प्रदार्शित करता येईल का? फार मोठे आव्हान

होते. काही झाले तरी प्रयत्न करायचाच ठरवून मी त्यांचा निरोप घ्यायचा ठरवले. सामान एकत्र केले. शिवूला जवळ बोलावले. शंभरा शंभराच्या पाच नोटा काढून त्याच्या पुढे केल्या. विंचू, साप दिसल्या सारखा तो एकदम लांब गेला आणि म्हणाला,

"नुको भाऊ! नुको! ईक हाय पैसे म्हणजे. एवढे पैसे हायत म्हायत पडल कोनाला तर राती आमचा जीव घेतील आणि पळून जातील. पैसा वायट. घरात ठेवू नये. फुका जीव जातो." पैशाना हात न लावताच तो परत पडवीत गेला.

ते पैशाला एवढे घाबरणारे होते? की गरजेपेक्षा जास्त काही संग्रह नको असे मानणारे होते? जंगलात यांच्या घरी पैसे आहेत हे कोणाला माहीत पडणार होते? आजू बाजूला तर कोणीच नव्हते. असा विचार करून ते पैसे मी शेवता समोर धरले. ती देखिल घेईना. म्हणाली, "भानामती सांगल सगळ्याला आणि आमचा जीव जायल. नुको भाऊ, या पडक्या घरात काय पण लपत नाय. वर खाली सगळीकडे भोकांचा घर आमचा. मारून पैसे काढून घेव जातीत. फुकट जीव जायत."

परत एकदा निरीच्छ, साधुत्व असलेल्या स्वभावाचे दर्शन होत होते. पैसे परत खिशांत ठेवले. सामान उचलायला गेलो. त्यात फळांची पिशवी होती. सामान परत ठेवून सखूला म्हणालो,

"सखू पाने आण. फळे खाऊया." सखू घरात पळाली आणि शिवा पुढे येत म्हणाला. "हां! हां! ह्या बरा. खायचा कायपण द्या. खाताव आमी."

मी खिशातून छोटा चाकू काढला. सफरचंद, चिकू कापून कर्दळीच्या पानावर मांडले. मग डाळींब फोडून त्याचे दाणे काढू लागलो तिघेही टक लावून पहात होते.

"घ्या झाली कापून आणि ही राहीलेली मागाहून कापून खा. पण उद्यापर्यंत संपवा नाहीतर खराब होतील."

"ह्या! काय लागतत खावन बघा गो." शिवू.

त्या दोघी त्याच्याकडे पहात हंसत होत्या. हळू पुढे होऊन त्यांनी खायला सुरवात केली आणि मी कॅमेरा परत बाहेर काढला. माहीत होते. त्यांचे आता मस्ती आणि खिदळण्याचे प्रकार चालू होणार. मी एक एक स्नॅप घेत होतो. एवढयात शिवू एक सफरचंदाचा तुकडा घेऊन उठला. त्याच्या मागे सखू लागली. "माका दी. तू खूप खाल्लस. माका रवलेच नाय. माका दी." ती खेळकर पळापळ मी पहात होतो. कॅमेऱ्यात टिपत होतो. आता शेवताही उठली. ती देखिल शिवूच्या मागे लागली. "दे तिका! दे आदी ती सखूक." असे बडबडत हंसत ती शिवूला पकडायला धांवली. शिवू सफरचंदाची फोड हातात पकडून पळत होता. फोड तोंडात सहज टाकता आली असती. पण तो बहुदा त्यांना खेळवत होता.

शेवताने मागून शिवूला पकडले तेवढयात सखूही आली. तिने समोरून शिवूचा खांदा पकडला दोघानी हलकासा हासडा दिला आणि शिवू जमिनीवर आडवा झाला. त्याच्यावर शेवता अर्धवट पसरली. सखू बाजूला उकीवडी बसून खिदळू लागली आणि ती सफरचंदाची फोड बेवारशासारखी एका बाजूला जाऊन पडली. तिघेही हसत होते. शेवता. हसत तशीच शिवूवर पसरली होती. उठतही नव्हती ती दोघे अशी काही एकमेकांवर पडून खिदळत होती की ते एक अप्रतिम शिल्प वाटत होते.

शिवू उताणा पडला होता. लंगोटीचा पुढचा शेव एका बाजूला कलंडला होता. त्याच्यावर एक कोन करून शेवता उताणीच आडवी झोपली होती. तिची कंबर जमिनीवर होती. पाठ शिवूच्या छातीवर व डोके छाती पलीकडे जमिनीकडे कललेले. केसांचा ढिगारा जमिनीवरून पसरत गेला होता आणि शिवूचा चेहेरा अर्धवट झाकत होता. तिचे उरोज असे काही वर आले होते की जणू काही सह्याद्रीची दोन समान शिखरेच.

दोघेही खिदळत होते. जणू ती भूमी भूकंपाने हलते आहे असे वाटत होते. हा शृंगार होता की खेळ होता? सर्वांच्या समोरची ही रती क्रीडा होती? प्रेमाचा एक वेगळा आविष्कार माझ्या समोर होता.

काहीही असले तरी त्यात सौंदर्य होते, अश्लीलता नव्हती. संयम होता. म्हणूनच सर्व दृष्य खेळाचाही आणि शृंगाराचाही भास देत होते. कसे प्रतित होणार हे माझ्या चित्रात? फार कठीण वाटत होते. हे लोक माझ्या चित्रकारीतेला आव्हान देत होते. शिवू तिच्या डोक्यावरून हात फिरवत होता. सखू लाडाने शिवूला डोक्यावर चापटया मारत होती की थोपटत होती हे समजत नव्हते.

एक निरागस खेळ माझ्यासमोर चालला होता कॅमेऱ्यात बंद होत होता. माझ्या आनंदाला सीमाच नव्हती. मी निघता निघता त्यांनी अजाणतेपणी दिलेली ही भेट अप्रतिम होती. मी मात्र त्यांना काय देऊ याचाच विचार करीत होतो.

“तू काय देणार यांना ते स्वतःच समृद्ध सम्राट आहेत. सुख, आनंद, सौष्ठव, खेळकर, खोडकर, निरागसतेने भरलेले त्यांचे आयुष्य, असले एकाद्या सम्राटाच्या सुद्धा नशीबी नसते. तू अशा लोकाना काय देऊ शकतोस. आणि त्यांनी जे काही तुला दिले त्यामुळे त्यांच्याकडे काही कमी झाले का? तू पैसे दिले असतेस तर तुझ्याकडे तेवढे कमी झाले असते. बघ! बघ! एकादी भेट दिल्यानंतर सुद्धा समृद्धी कशी वाढते ती.” विचार करतच मी कॅमेरा बंद केला. ही भेट खूप काही शिकवून गेली. अंतर्मुख झालो. सामान उचलले त्यांचा निरोप घेताना गलबलल्यासारखे होऊ लागले. मी पूर्वी कधीच असा झालो नव्हतो. चार दिवसात यांनी मला अमुलाग्र बदलून टाकला होता.

"येतो मी. माझी चित्रे पुरी झाली की येईन परत भेटायला" कसेतरी शब्द तोंडातून बाहेर पडले. जमिनीवर पसरलेले शिवू, शेवता व सखू एकदम धडपडत उठले.

"जाताय भाऊ? परत येवा हां!" सखूच्या तोंडून हा निरागस निरोप मिळाला. शिवू धावत आला. माझ्या हातातला स्टँड आणि सामानाची पिशवी काढून घेऊन म्हणाला, "लय सामान! थोडा मी घेतय. दमशाल तुमी." चार दिवसात मी त्यांच्याही जिव्हाळ्याचा झालो होतो.

कसे बसे समजावून मी शिवूला परतवले आणि सर्व सामान घेऊन कँपचा रस्ता पकडला. रस्ताभर ते तिघेही नजरे समोरून जात नव्हते. त्यांचे खिदळणे, नदीकडे धांवणे, नदीवरची आंघोळ, शिवूचे मासे पकडणे. सगळा चित्रपट डोळ्या समोरून जात होता. चालण्याचा वेग आणि लय या चित्रपटातल्या प्रसंगाबरोबर बदलत होती. गेले चार दिवस मी कोणत्या विश्वात होतो? कोण होते हे? यक्ष? किन्नर? की गंर्धव? मी माणसांच्या जगात होतो असे वाटतच नव्हते. यांच्या विश्वात भांडण, राग, अविश्वास, लोभ, कुत्सितपणा, स्वार्थ असल्या कसल्याच गोष्टीना थारा नव्हता. आनंद, खेळ, बागडणे आणि भरपूर प्रेम करणे एवढेच माहीत असलेले सह्याद्रीच्या डोंगरातले, नदीकांठच्या जंगलातले ते तीन जीव नक्कीच मनुष्य प्राणी नव्हते. मग कोण होते.

लहानपणी यक्ष, किन्नर, गंधर्वांच्या खूप गोष्टी ऐकल्या होत्या. हे बहुदा त्यातलेच कोणीतरी असावेत.

विचारांची ही शृंखला अशीच चालत राहीली असती. पण कँपकडे पोचत आलो होतो. कँप जवळ हालचाल दिसत होती. तंबूत माझे तिघेही दोस्त आपले सामान एकत्र करताना दिसत होते. आमची ट्रीप संपत होती. मनात एक हुरहुर घेऊनच मी सामान आवरू लागलो.

.....

घरी पोचलो तेव्हा रात्र होत आली होती. सबंध दिवस बसचा प्रवास कंटाळा देत होता. दुसऱ्या दिवशी अंग दुखत असतानाही स्टुडीओत बसून काम सुरू केले. स्टुडीओ म्हणजे चाळीतील शेजारची एक भाडयाने घेतलेली खोली होती. कामाला सुरवात केली. पहिलेच रेखाटन केलेला कॅनव्हास स्टँडवर चढवला.

दारात उभी असलेली सखू, तिच्याकडे कलती मान करून पहाणारी शेवता आणि खाली बसून त्या दोघांकडेही हसत पहात नारळ फोडणारा शिवू. जवळ जवळ पांच मिनिटे समाधीत गेल्यासारखा ते

चित्र पहात असताना खरोखरचा प्रसंग डोळयासमोर आला. अगदी जशाच्या तसा डोळयासमोर तरळू लागला. मी तो मनात घोळवू लागलो. मग केव्हातरी ब्रश उचलून रंग भरायला सुरवात केली. किती वेळ गेला ते समजेच नाही.

"दादा! जेवायला चल ना! भूक लागलीय मला." माझी छोटी बहीण आदीला सांगायला आली आणि समाधीतून मी बाहेर आलो.

दुपार नंतर परत त्या चित्रावर काम करू लागलो. पण आता सगळेच प्रसंग एका मागून एक डोळ्या समोरून सरकू लागले. काम करणे बाजुलाच राह्यले. कोणतेही चित्र स्टँडवर चढवले तरी दुसरे प्रसंग डोळयासमोर येत. मग ब्रश थांबून जाई मनात म्हणालो "चला पोटभर पुन्हा एकदा ते सगळे प्रसंग आठवूया. मन भरले की मग एक एक चित्र रंगवायला घेऊ."

हातात ब्रश खेळवत किती वेळ गेला कोणास ठाऊक. उजेड कमी होऊ लागला होता. संध्याकाळ होत आली होती. तोंडावर पाणी मारून फ्रेश झालो. घरी जाऊन कुडता चढवला आणि बाहेर पडलो. मुंबईत तर माणसेच माणसे. पूर्वीही त्यांना पाहिले होते. पण आता त्यांना पहाताना पुरुषांची तुलना शिवू बरोबर आणि बायकांची तुलना शेवता व सखू बरोबर होऊ लागली. रंग रंगोटया,व कपडयांच्या चमकत्या आवरणामधे आपले कृश नाहीतर स्थुलपणा दडवणारे सगळे दिसत होते.

शिवू, शेवता व सखू दररोज मासा व भात खात होते. दुसरा कोणताही आहार करताना दिसत नव्हते. जंगलाची हवा, नदीत डुंबण्याचा व्यायाम आणि भात माशाच्या आहारावर ते एवढे सुदृढ कसे? या विचारांची मालीका सुरू झाली. त्यांच्याकडे आनंद होता. समाधान होते. कधीही कोणी रागावताना भांडताना त्या चार दिवसात दिसले नव्हते. खेळकर, खिदळणारे, मस्तीत दंग आपल्या विश्वात रमलेले ते तिघे, बहुदा मनाच्या स्वच्छ ठेवणी मुळे शरीरानेही तसेच सुदृढ झाले असावेत. पावाला आंबुस वास येतो म्हणून तो शिळा, कोंबडीचे अंडे फोडू नये ते पाप. असा पक्का समज असणारे ते मासे मात्र मारून आणत ते पाप नाही असे त्यांना का वाटते. मनात चुकचुकलो विचारले पाहिजे होते. काहीतरी जगावेगळे नक्कीच ऐकायला मिळाले असते.

या तंद्रीत चालताना मी केव्हा वळलो परत घरी पोचलो हे समजलेच नाही. ही अशीच स्थिती दोन तीन दिवस गेल्यावर मग मात्र मनाची तयारी केली. असे चालणार नाही. उद्या पासून एकाच चित्रावर व एकाच प्रसंगावर विचार करायचो. एक एक चित्र पुरे करायचे.

आपण ठरवतो पण तसे घडते थोडेच. त्यावरही उपाय काढला. आता दोन स्टँड लावले. सगळे रेखाटलेले कॅनव्हास एका बाजूला लावून ठेवले. दोन चित्रे दोन स्टँडवर लावली. मग पहिल्या चित्रातील

प्रसंग आठवून त्यात रमलो. चित्र रंगवीत गेलो. तासभर गढून काम झाले. पण आता डोळ्यासमोर नदीतला प्रसंग येवू लागला. शिवू मोठा मासा घेऊन आलाय आणि शेवता व सखूच्या मधे पकडून त्याला फडफडवतोय. त्या दोघेही खिदळत आहेत. पटकन मी त्या रेखाटनचा कॅनव्हास उचलला स्टँडवर चढवून रंगवू लागलो अगदी स्पष्ट पणे पूर्ण प्रसंग डोळ्यासमोर होता. त्याप्रमाणे रंग भरत होतो. हा प्रसंग जरा जास्त वेळ रेंगाळला म्हणून कामही बरेच झाले.

मनाच्या लहरीपणाला दाद देतच चित्रे पुरी करायची ठरवून मी कामाला लागलो.

महिना झाला एकही चित्र पूर्ण झाले नव्हते. मन पूर्ण चित्रे पहायला अधीर झाले होते. सर्व काही पणाला लावून मी गेला महिनाभर स्टुडीओतच ठिय्या मारून होतो. हळू हळू चित्रे पूर्ण करायची. किती झाली हे पहायचेच नाही. होतील तेव्हा होतील असा विचार केला. दुसऱ्याच दिवशी मन ताळ्यावर आले. एकाच चित्रावर काम होऊ लागले.

पुढचे दोन महिने चित्रे पुरी करण्यात गढून गेलो होतो. आठ चित्रे पूर्ण झाली, असे मनाला समजावले. तरीही अठ्ठवीस चित्रे अर्धवटच होती. आता ते प्रसंग मनातही अस्पष्ट होत आहेत अशी शंका येवू लागली.

एके दिवशी सगळे फोटो काढून बसलो. शिवू, शेवता व सखू परत जीवंतपणे नजरे समोर आली अस्पष्ट झालेले त्यांचे हसू स्पष्ट पणे नजरे समोर आले. परत जोमाने कामाला लागलो. जुनी चित्रे पूर्ण करता करता नवी चित्रे रेखाटू लागलो. फोटोनी माझ्या डोळ्या समोर धोतर फाडून नवी लंगोटी नेसणारा शिवू, नवी साडी जुन्याच चोळीवर मिरवत येणारी पिवळ्या साडीतली सखू आणि लाल परकरावर पिवळी साडी नेसून आलेली शेवता नाचू लागले. त्यांची वेगवेगळी रेखाटणे सुरू झाली. सफरचंदाच्या शेवटच्या फोडीवर घातलेला दंगा व नंतरचे उताण्या शिवूच्या अंगावर शेवताने उताणेच पसरलेल्याचे दृष्य अप्रतिम रेखाटले गेले होते. या प्रसंगाचीच आठ दहा रेखाटणे झाली होती. ही एक सेरीज म्हणून छान प्रदर्शित करता आली असती.

माझे मित्र शंकर, मिलींद, सुरेश कित्येकवेळ घरी येऊन गेले होते पण दरवेळी मी त्यांना दुसरेच कुठलेतरी पेंटींग स्टँडवर ठेवून दाखवत होतो. ट्रिपमधले एकही चित्र मी त्यांना दाखवले नव्हते. सर्व पूर्ण झाल्यावर दाखवून त्यांना मत विचारायचे ठरवले होते. आता तो दिवस आला होता. शिवू, शेवता आणि सखूची अठ्ठेचाळीस वेगवेगळी पेंटींग झाली होती. माझ्या खोलीत तीनही भिंतीच्या बाजूला उभी केली तरी आठच पेंटींग एका वेळी दाखवू शकत होतो.

ते आले की सांगत त्या ट्रीप मधल्या त्यांच्या निसर्ग चित्राना कॅलेंडर म्हणून ऑर्डर मिळाल्या होत्या. शंकरची पेंटींग विकली गेली होती. एक एका पेंटींगला दहा बारा हजार आले होते. मी सर्व ऐकत होतो. मला आता पैशांची चणचण वाटत होती. पण केलेल्या कामावर विश्वास वाटत होता. हे काम मला नक्कीच काहीतरी मिळवून देणार असे वाटत होते.

तिघानाही म्हणालो, “अरे मी काही पेंटीग्ज गेले कित्येक दिवस बनवत होतो. उद्या पासून एक आठवडा आपण ती एकत्र पहायची आहेत व त्यावर तुमची प्रांजळ मते तुम्ही मला सांगायची आहेत.” ठरल्या प्रमाणे दुसऱ्या दिवशीपासून आम्ही सुरू केले. मी सहा पेंटींग्ज पहिल्या दिवशी लावली. पडके घर, नारळ सोलणारा शिवू, पदर फडकवत नदीकडे धांवत सुटलेली सखू, नव्या साडीच्या बोंग्याना नीट करणारी शेवता, अशा मला जास्त पसंत न आलेल्या चित्राना मी पहिल्यांदा डिस्प्ले केले.

चित्रे पहाताच शंकर, मिलींद आणि सुरेश अवाक् होऊन पहात राहिले. एक एक चित्र न्याहाळताना “ह्या!” “वा! काय अप्रतिम पोज आहे. अरे ही कल्पनेतील आहेत की मॉडेल आहेत?” असंख्य प्रश्न माझ्यावर ते सोडत होते. पण पूर्ण लक्ष चित्रांवर खिळवून होते. मी एकही उत्तर देत नव्हतो. शेवटी सगळे माझ्याकडे वळून म्हणाले,

“अरे बोलना! हे सर्व केव्हा आणि कसे ठरवलेस? आणि किती दिवसापासून करतोयस ही पेंटींग्ज. आम्हाला दाद पण लागू दिली नाहीस.”

“हे बघा! हा मी पाहिलेला कोकणातला निसर्ग आहे. तुम्ही सगळयानी डोंगर, नद्या, झाडे, मावळता सूर्य असली निसर्ग चित्रे केलीत. मला हे तिघांचे कुटुंब भेटले. या जगाचे कुठलेच रिती-रीवाज न मानणारे किंवा माहीत नसलेले. निसर्गातच रहाणारे अगदी नैसर्गीक वागणारे. भूक लागली की जेवणारे. ते ही अगदी एकच अन्न मासे व भात. अरे ते तिघेही इतके आनंदी, सुखी व समाधानी होते की राजाला देखिल असले सुख, असला आनंद मिळणे शक्य नव्हते. त्यांनी मला एवढे चित्रविषय दिलेत की येती दोन तीन वर्षे तरी त्यांना रेखाटून रंगवण्यात निघून जातील. मी पाहिला तो हा निसर्ग. निरागस, खेळकर, हंसरा अठरा विश्वे दारिद्रय असूनही मनात जराही कटुता नसलेला. तापत्या उन्हात तळपणारे, पूर आलेल्या नदीत उड्या घेणारे, पोहोणारे. जंगलात निर्भयतेने राहाणारे. सतत कामे करत राहाणारे. आणि तरी देखिल निखळपणे हंसत आयुष्य घालवणारे हे जीव, त्या निसर्गाचाच एक भाग म्हणून जगताना पाहिले आणि वेडा झालो. चित्रकाराला आव्हान दिले होते त्यांनी. मी ते स्वीकारलेय.

ह्याना मॉडेल म्हणणे शक्यच नाही. एकाद्या पोजमधे दोन मिनीटे स्थिर उभे रहाणे त्यांना माहीतच नव्हते. त्यांच्या क्षणैक मिळणाऱ्या पोझेस मनावर पटकन कोरून ठेवाव्या लागत. एकाच

सकाळी त्यांना उभे करून रेखाटायचा प्रयत्न केला तोच. त्यावेळी समजले, ही मॉडेलसारखी वापरता येणारी माणसेच नाहीत. ही त्या जंगलातली रानपाखरे आहेत. अशीच भीरभीरत राहाणार. यातून त्यांना नजरेने टिपून सांठवायचे आणि रंगवायचे. केवढे मोठे आव्हान. पहाल आत्ता तर सहाच पेंटीग्ज पाहिलीत. सर्व पहा आणि मग ठरवा. ही पोर्ट्रेट आहेत की निसर्ग चित्रे आहेत." एक समाधानाचा सुस्कारा टाकत मी गप्प झालो. एक निरव शांतता पसरली. पांच एक मिनीटानी शंकर उदगारला. "ए! याचे एक्झिबिशन लावूया छानशा आर्ट गॅलरीत. काय उधारी करून का होईना हे करुयाच." हे ऐकताच मी घाबरलो,

"नको रे बाबा! ह्या स्टुडीओ साठी घेतलेल्या जागेचे भाडे देताना आणि आपला खर्च काढताना नाकात दम येतो. आणखी उधारी कुठे करतोस?"

"अरे! चांगल्या ठीकाणी डिस्प्ले करता आली ही पेंटीग्ज तर खूप पैसा मिळेल. पैसा सोड नावही मिळेल. तू काळजी सोड. मी उद्या पासून तुझ्या सर्व चित्रांचे फोटो काढतो, आणि आर्ट गॅलरी शोधतो. फार काय होईल? आर्ट गॅलरीवाल्याला भाडे न देता सेलवर कट चालेल का विचारुया, देऊ त्यांना २५ ते ३० टक्के. "

माझ्या कोणत्याही सूचने शिवाय मित्रच सगळे ठरवीत होते. मी एकदम म्हणालो, "अरे! पण काही पेंटींग्ज मी विकणारच नाही हां! ती मी माझ्याकडे रेफरन्स साठी ठेवणार आहे."

दररोज सकाळी संध्याकाळी मी त्यांना सहा सहा पेंटींग्ज दाखवत होतो. शेवटी सहा पेंटींग उरली. ती सगळी माझ्या मते अप्रतिम होती. सखू दारात पाय मुडपून उभी, आकाशाकडे पहात उभी असलेले पेंटींग मी सर्वात शेवटी ठेवले होते. त्या चित्रात नदी, नदीकडे उतरत जाणारा रस्ता, झाडाला टेकून उभी असलेली झोपडी, झोपडीची मोठी झालेली दाराची चौकट, आणि त्यावर जीवंत रंगवलेली सखू. ज्यामुळे मला ठेच लागून पाय मुरगळला होता ते चित्र मी अगदी शेवटी ठेवले होते. त्यांचा नदीवरची साडी सुकवण्याची आणि चोळी वाऱ्यावर धरलेल्याचे पेंटींग त्या आधी दाखवणार होतो. ही दोन पेंटींग माझी अत्यंत प्रिय होती. त्यात मी जीव ओतून रंग भरले होते. त्यांना जसेच्या तसे जीवंत करण्याचा प्रयत्न केला होता. ही दोन्ही पेंटींग मी विकायची नाहीत असेच ठरवले होते.

जेव्हा ही सहा चित्रे मी त्यांना दाखवली तेव्हा ते आ करून पहात बसले. शेवटचे चित्र मी खोलीच्या मागच्या खिडकी जवळ, बाहेरचा पूर्ण प्रकाश पडावा असे लावले होते. त्यातील बारकावे, रंगछटा, चेहऱ्यावरचे भाव, सखूचे मोहक व्यक्तित्व चांगले नजरेत यावे म्हणून हा आटापिटा केला होता. सर्व चित्रे एक एक पहात त्यावर चर्चा करीत ते तिथे माझ्या पेंटींगची वाहवा करीत होते. जवळ जवळ दोन तास तरी गेले असतील. एकदम् उजेड कमी होतोय असे वाटले. संध्याकाळ व्हायला अजून बराच

वेळ होता. अंधारले का हे पहायसाठी मी खिडकीकडे आलो. तर माझ्या अंगावर दोन तीन मोठाले थेंब पडले. पाऊस? या दिवसात पाऊस कुठला? मी खिडकीचे दार बंद केले. चुकार थेंब माझ्या त्या अप्रतिम पेंटींगवर पडले असते.

खिडकी बंद करून मी पेंटींग निरखून पाहू लागलो. काही झाले नव्हते म्हणून हायसे वाटत होते. एवढयात सखूच्या मुडपलेल्या पायाच्या मांडीवर एक भला मोठा थेंब पडलेला दिसला. त्यात रंग विरघळू पण लागला होता. माझी तारांबळ उडाली. शंकर, मिलींद, सुरेश तिघेही त्या चित्राकडे पहात होते. तो थेंब हळू हळू घरंगळत खाली येत होता. बरोबर रंगही उतरत होता. मी ब्रश घेऊन त्याला टिपले. मिलींद ओरडला, “थांब काही करू नकोस. सुकल्यावर काय करायचे ते पाहू. कदाचित काहीच करावे लागणार नाही. हा थेंब चित्रात अजून काहीतरी चांगले भरेल असे मला वाटते.”

माझ्या ब्रशने थोडेसे पाणी टिपले होते. आता घरंगळ थांबली होती. वरचा पेंट पाण्याबरोबर उतरल्या मुळे तिच्या मांडीचा काळेपणा अंधुकसा, चुटपुटता दिसत होता. मी ते चित्र तसेच ठेवले. खिडकी पासून लांब नेले. हळू हळू प्रकाश वाढू लागला चुकार ढग निघून गेला होता.

चित्र आता पूर्ण प्रकाशात पाहू लागलो. त्या थेंबाने तिच्या साडीचा कलर उतरवला होता. आता तो सुकत आला. खरोखरच त्या थेंबाने त्या चित्रात तिच्या द्रारीद्र्याला अजून करूण केले होते. त्या खालच्या रेखाटलेल्या रेघोटयांमुळे त्या ठिकाणी साडी विरल्यासारखी वाटत होती. चित्रावर त्या थेंबाने एक छान टिका लावला असे सगळेच म्हणू लागले.

घाई गडबडीने शंकरने त्या चित्राचे दोन तीन फोटो काढले. आणि निघाला. कसल्यातरी विचारात असल्या सारखा वाटत होता.

सगळे गेल्यानंतर मी शिवूच्या घरी काढलेले फोटो कॅमेऱ्यातच पहात बसलो. जवळ जवळ १७० फोटो होते. एवढयाचे प्रिंट काढणे फारच खर्चीक झाले असते. मग एक एक फोटो पहात मी अनुभवलेले ते चार दिवस आठवीत बसलो.

दिवस जात होते फोटो वरून काही पेंटींग तयार केली. फोटो फक्त आठवणी करता वापरत होतो. प्रसंग डोळयासमोर अगदी अनुभवले होते तसेच प्रकट होत होते. बरेच दिवस झाले असल्यामुळे काही प्रसंग स्मृतीत अंधुक झालेले असायचे. फोटो पाहीले की त्यांना उजाळा मिळायचा. अशी सगळी पेंटीग्ज करण्याचा अट्टाहास करीत होतो.

एक दिवशी शंकर आला. गडबडीत असल्या सारखा म्हणाला, "आली! अरे चल लवकर तयार हो. आपल्याला एके ठिकाणी जायचे आहे. फार मोठ्ठी माणसं आहेत. त्यांना तुझी ओरीजीनल पेंटींग पहायची आहेत. तीन चार चांगली पेंटींग बरोबर घे.!"

"अरे हो! पण कुठे जायचे? कशा करता जायचे हे तर सांगशील?"

"अरे बाबा चल ना तू. जायला एक तास लागेल तेव्हा सांगतो. तयार हो आणि चल. माझी दोन महिन्यांची पायपीट कामी आलीय."

मी गपचुप तयारी केली. चार पेंटीग व्यवस्थित पॅक केली व बरोबर घेतली.

बस फोर्टमधे जाणारी होती. मी शंकरला विचारले, "काय रे कुठे घेऊन चाललायस?"

"अरे गेले दोन महिने एक एकाला पकडत होतो. तुझ्या पेंटीग्जचे फोटो घेतले होते ना मी, ते दाखवून अभिप्राय विचारत होतो. सगळे साले धंदावाले बसलेत रे आर्ट गॅलऱ्या लावून. आर्ट कशाशी खातात हे माहीत तरी आहे का यांना. शेवटी गेल्या आठवडयात हिय्या करून एका फाईव्ह स्टार हॉटेलच्या आर्ट गॅलरीच्या मॅनेजरला भेटायला गेलो. अरे आपल्या जे.जे.तलाच होता. मुरारी सावंत नाव आहे त्याचे. आपल्याला तीन वर्षानी सिनीयर. मग काय! त्याने पेंटीग्जचे फोटो पाहिले. म्हणाला," "छानच आहेत. एक्झिबिशन लावणार का" मग त्याला मी सगळी परिस्थिती सांगीतली. तो म्हणाला "फोटो चार दिवस मला ठेवावे लागतील. मी वर बोलतो आणि पहातो काय करता येते ते." काल त्याचा फोन आला. चार पेंटीग्ज व तुला बरोबर. घेऊन या म्हणाला. आत्ताची अपॉइटमेंट आहे. अजून दीडतास आहे. पोहोचू आपण तो पर्यंत.

आम्ही तिथे पोहोचलो त्यावेळी मुरारी सावंत तिथे होतेच. आम्हाला समोर आदराने बसवत म्हणाले, "पेंटींग्ज आणलीत? दाखवा पाहू देत मला," मग कुणाला तरी फोन वर म्हणाले. "अरे तीन कॉफी पाठव"

फाइव्ह स्टार हॉटलची कॉफी ती ही फुकट? भाग्य उजळायला सुरवात झाली की काय? असा एक विचार चमकून गेला. मग जे काय झाले त्याचा तपशील काय सांगणार.

त्या हॉटेलमधे माझी एक्झिबिशन्स् वारंवार लागू लागली. पहिल्याच वेळी एक पेंटींग ज्यात शिवू नदीत मासा घेऊन शेवता आणि सखूच्या मधे उभा आहे ते चित्र हॉटेलनेच घेतले. ते हॉटेलमधे प्रदर्शित करणार होते. चित्रांची किंमत माझ्याशी बोलून ते ठरवत. त्यांत ते पंचवीस टक्के कापून बाकीचे मला देत. ज्या चित्रांची विक्री होई त्यांचे पैसे मिळत. पण ते देखिल भरपूर असत. शंकर, मिलींद सुरेश तिघेही मदतीला हजर असत.

दोन वर्षात संपन्नता आली. नावही झाले. माझ्या चित्राना फार चांगला प्रतिसाद मिळू लागला. फ्रीलान्स फाईन आर्टीस्ट म्हणून नाव झाले. मी लग्न करून गृहस्थाश्रमी झालो. नवा फ्लॅट आला, गाडी आली. सुख संपन्नता ओसंडू लागली, सर्वच खूष होते. शंकरने एक स्टुडिओ चालू करून ठीक ठाक कमाई करायला सुरवात केली होती. सुरेश, मिलींदनी आता आपला जम बसवला होता. सगळे संसारी झालो होतो.

प्रदर्शने चालू होती. वर्षे जात होती. सुबत्ता, श्रीमंती या बरोबर घरात मुलांची किलबिल देखिल वाढत होती. एस्. युसुफ अली, मी एक चित्रकार म्हणून मान्यता पावत होतो.

मी आता पर्यंत जी प्रदर्शने केली त्यांत मात्र आग्रहाने काही चित्रे कधीच प्रदर्शित केली नव्हती. एक ते पहिलेच चित्र, सखू दारात उभी असलेली. दुसरे चित्र शेवता, सखू नदीत आंघोळ करून झाल्यावर, वाऱ्यावर साड्या वाळवतानाचे अर्धनग्न चित्र व शेवटची सेरीज ज्यात ते हसत खिदळत सफरचंद खात खेळताना व शेवटी उताण्या शिवू वर, शेवताही उताणी पसरलेली त्याचे चित्र. ही चित्रे सुंदर झालीच होती पण ती कधीही माझ्या पासून दूर होऊ नयेत अशी माझी इच्छा होती. पण जगासमोर ही यायला पाहिजेत हा सर्व मित्रांचा सल्ला मी मानला. यावेळी त्या हॉटेलच्या आर्ट गॅलरीचे पैसे भरायचे चार दिवस प्रदर्शन ठेवायचे पण ही चित्रे विकायची नाहीत असे ठरवले.

प्रदर्शनाला फार चांगलीच गर्दी होती. सखूच्या मांडीवरून ओघळलेल्या थेंबाने किमया केली होती. त्या चित्राकडे सर्वजण थवकून पहात फार वेळ घेत होते. तसेच त्या साडया वाळवतानाच्या नदीवरच्या चित्राकडेही गर्दी करीत होते. काही आंबटशौफी, बिभुक्षीत नजरानी चित्र न्याहाळताना दिसले की राग यायचा.

“जरा साडी बाजूला केली. असती तर?” असा शेरा ऐकला की मला फार वाईट वाटे. त्यांना सणसणीत उत्तर द्यावे असे वाटे. पण काही फार समजू कलाकार येत. आपासात गप्पा करताना दिसत.

“खरोखर जीवंत पोझ आहे रे!”

“वारा सुद्धा फडफडत्या चोळ्यावरून अक्षरशः फील होतोय ”

“चित्रात वाहात्या पाण्याचा भास काय जीवंत केलाय.” असे शेरे ऐकले की आनंद व्हायचा.

शेवटच्या दिवशी सकाळी अकराच्या सुमारास मुरारी घाई गडबडीत आला. म्हणाला, “आज शेवटचा दिवस म्हणून दुपारी लवकर आवरा आवर करू नका. आमचे एम.डी. येणार आहेत. त्यांना तुमच्या चित्रांबदल समजले आहे. ते येवून गेले की आवरायला घ्या.”

मी स्तब्ध झालो. एवढया मोठया हॉटेलचे एम्.डी. येणार म्हणून आनंद झालाच पण बरोबर एक उत्कंठाही लागून राहिली.

दुपारी अडीच तीनच्या सुमारास मुरारी व बरोबर चार पाच लोक येताना दिसले. पुढे होऊन मी त्यांचे स्वागत करीत बोलावले. त्यात एक पूर्ण सूटात असलेले. मराठी नसलेले, प्रसन्न व्यक्तिमत्वाचे गृहस्थ होते. त्यांना सर्वजण अदबीने उत्तरे देत होते. मी समजलो, हे एम्. डी. असणार.

मुरारीने त्या सर्वांना माझी ओळख दिली. “हे चित्रकार युसुफ अली. जे.जे.चे आहेत.” एम्. डी. नी मान हलवून मी केलेल्या नमस्कारचा आणि माझ्या ओळखीचा मंद हसत स्वीकार केला. पण काहीही न बोलता ते प्रदर्शनाकडे वळले. फक्त बारा चित्रांचेच प्रदर्शन मी लावले होते.

एवढे मोठे व्यक्तित्व पण प्रत्येक चित्राकडे ते बारकाईने पहात मुरारीशी काहीतरी बोलत होते. जवळ जवळ एक तास ते पहात होते. आता ते शेवटचे चित्र पहात होते. मागे वळून त्यांनी मला खुणेनेच बोलावले.

“तुमच्या चित्रांमधे तिघांचेही चेहरे सारखेच आहेत. तुम्ही मॉडेल वापरून ही चित्रे बनवलीत? की मनात रंगवून?”

मी माझ्या मोडक्या तोडक्या इंग्रजीत बोलण्याची तासभर केलेली तयारी फुकट गेली होती. ते स्पष्ट सुंदर मराठीत बोलत होते. फक्त उच्चारांवरून ते मराठी नाहीत हे माझ्या लक्षात आले.

“सर! म्हटले तर ही मॉडेल आहेत म्हटले तर नाहीत. ही तर मला भेटलेली रानातील स्वच्छंद जगणारी माणसे आहेत. त्यांना चार दिवस न्याहाळून, त्यांच्या बरोबर राहून मी मनावर कोरले. त्यांची एक दोन चित्रे तिथेच रेखाटून त्यांचे चेहेरे, शरीर यष्टी कैद केली. निरनीराळे खेळ, त्यांचे हसणे, बागडणे सगळे मनावर कोरले. गेली काही वर्षे त्यांचीच असंख्य चित्रे मी काढलीत. काही मनची पण प्रत्यक्षात पाहिलेली.” मी बोलता बोलता थांबलो. त्यांच्या हंसऱ्या डोळ्यात कौतुक भरले होते. त्यांनी माझा हात पकडला. शिवूवर, शेवता उताणी झोपलेली असलेल्या चित्रासमोर मला नेत ते म्हणाले.

“Is this from your memory or you actually witnessed this? Are they playing or courting? Because, this marvelous picture does not explain both clearly, but both are present in this picture, it is a play at the same time it is a play before love. Marvelous.”

मी मनात मोहरत होतो. एवढयात ते शेवटच्या चित्राकडे मला घेऊन गेले. अगदी पहिले चित्र, मला ठेच लावणारी सखूची दारात उभी असलेली मूर्ति. तिच्या चित्राकडे पहात ते म्हणाले,

"ही कुठे पहाते आहे! काय पहाते आहे? प्रियकराची वाट पहाणारी अभिसारीका आहे, की सुबत्ता आणणाऱ्या पावसाचे स्वागत करीत आहे? की नुसतीच पक्षी आणि निसर्ग न्याहाळते आहे? कोणत्याही ठाम भावांचे रेखाटन तिच्या चेहेऱ्यावर नसून सुद्धा किती मोहकपणा, निरागसपणा उतरलाय चित्रात. कमाल आहे. मी असे ऐकले आहे. की तुम्ही आजच्या प्रदर्शनात चित्रे विकणार नाहीत? जर पुढे मागे हे पेंटींग विकायचे ठरवलेत तर मला जरूर विचारा. मला माझ्यासाठी घ्यायला आवडेल हे चित्र."

मी थिजून गेलो होतो. एवढे कौतुक कधीच ऐकले नव्हते. चित्रकाराला याहून जास्त काय पाहिजे असते. एवढी मोठी व्यक्ति असून पेंटींगचे केवढे ज्ञान साठवून बसले होते ते. फार भाग्येच असे रसिक कुणाच्याही वाट्याला येतात.

मी काहीही बोललो नाही. शंकरला म्हणालो, "शंकर हे पेंटींग पॅक कर." शंकरने लगोलग पेंटींग उचलले.

मी मुरारीना म्हणालो, "सर थोडे थांबा! मला काहीतरी सांगायचेय साहेबाना." एम्.डी. माझ्याकडे पहात होतेच. मी त्यांना सर्व प्रसंग वर्णन केला. सखूचे हे मोहक दर्शन. मनावर कसे कोरले गेले. तिच्याकडे पहात चालताना ठेच कशी लागली. त्यानंतरची शिवू, शेवता व सखूची औषध करण्याची धांवपळ सर्व काही बोलत गेलो. शेवटी म्हणालो, "सर यातील ही तीन चित्रे मी अशी काही उतरवलीत की ती जवळ जवळ जीवंत झालीत. मी त्यांच्याकडे पहातो तेव्हा मला ती तीन रानपांखरे जवळ जवळ भेटतातच म्हणा ना! त्यांचे सहजभाव, सहज हसणे, निरागस वागणे, बागडणे, खेळणे सगळी चित्रे डोळ्या समोरून सरकतात. काहीतरी स्वच्छ, निर्भेळ, दैवी लोकांच्या संगतीत असल्यासारखे, अगदी अप्रतिम आनंदाचा उपभोग घेत असल्यासारखे वाटते. म्हणूनच मी ही चित्रे विकायची नाहीत असे ठरवले होते. पण एकादा रसिकही एवढा मोठा असू शकतो. तिच्या मनात कुठले भाव असतील याचा ठाव घ्यायचा प्रयत्न करतो हे पहिल्यांदाच पहातो आहे. मला, तिला पहाताना, चित्र काढताना, चित्र पुरे झाल्यावर आज पर्यंत देखिल असा विचार आला नव्हता. मला वाटते हे पेंटींग तुमच्याकडे अतिशय जपले जाईल, सांभाळले जाईल. ही माझ्याकडून तुम्हाला भेट देतोय समजा. "

"अहो या चित्राचे बरेच पैसे मिळतील तुम्हाला. मी असेच कसे घेऊ? तुमची किंमत सांगा."

"मला ती तर तुम्ही अगोदरच दिलीत. आता पैसे घेऊन रसिकतेचा अपमान करण्या एवढा मी समर्थही नाही की उद्धटही नाही. विनंती आहे ही भेट तुम्ही स्वीकारा."

शंकरने पॅक करून आणलेले चित्र मी त्यांच्या पुढे धरले. त्यांनी त्याला हात लावताच एक माणूस पुढे झाला आणि त्याने ते चित्र आपल्या हाती घेतले. ते थोडेसे पुढे गेले. परत वळून आले. मला

विचारले, "अहो या तिघाना तुम्ही भेटून आलात, त्यांची चित्रे काढलीत, परत जाऊन त्यांना भेटलात का कधी?" मी नकारार्थी मान हलवताच म्हणाले,"जरूर जाऊन भेटून या एकदा. माणसाने नेहमीच कृतज्ञ असावे. मग तो श्रीमंत असो की गरीब. कृतज्ञता मनात जपून माणूस खरा मोठा होतो. ज्या ज्या वेळी मी हे पेंटींग पाहीन त्यावेळी तुम्ही मला आठवाल. कधी भेटलात तर मी विसरणार नाही." एवढे बोलून ते निघून गेले. मनावर एक ओझे ठेवून गेले.

खरेतर मला एकदोनदा जाऊन यावे वाटले होते. पण त्यांना कपड्या शिवाय काय देणार हा संभ्रम पडायचा. फक्त कपडेच त्यांनी घेतले असते. मासा आणि भात या शिवाय काहीही न खाणारे ते, फार तर फळे नेली असती तर चालले असते. एवढे वनवासी लोक मी पाहिलेच नव्हते. शहर जवळ असून देखिल त्याचा जराही वारा की वास लावून घ्यायला ते तयार नव्हते.

पण आज मनावर फार मोठे ओझे एम्. डी. ठेवून गेले. खरेच मी चुकलो होतो. एकदाही त्यांना भेटायला गेलो नव्हतो, स्वतःच्याच विश्वात दंग होतो. पेंटींग, प्रर्दशने, वाहवा, पैसे यांतच रमलो होतो. त्यांना आठवायचे ते फक्त पेंटीग करण्याकरता. खरंच आपण काहीच कृतज्ञता त्यांना दाखवली नाही. विचारांचे काहूर डोक्यात गरम वारे फिरवू लागले. सर्व सामान टेंपोत भरून घरी पाठवले. गाडी काढली आणि आपल्याच विचारात घरी निघालो. गाडीतील एसीची थंड हवा देखिल डोके थंड करू शकत नव्हती. कृतज्ञता मनात जपणारा एक मोठा माणूस पाहिला होता. अगदी साध्या माणसाची देखिल कदर करणारा, त्याच्याशी आपुलकीने बोलणारा, त्याची कला तोंडभरून प्रशंणारा, त्यांनी "कृतज्ञता" या एका शब्दाने मला पुरे विस्कटून टाकले होते. त्या अवस्थेतच गाडी चालवत होतो. चुका करीत होतो. लोकांच्या रागीट नजरा आणि शिव्या खात मी घरी पोचलो. रात्र झाली होती. सर्व लोक जेवणासाठी खोळंबले होते. मी काही न बोलता टावेल उचलला आणि बाथरुममधे शिरलो. थंड पाण्याचा झोत अंगावर घेत उभा होतो. थोडा शांत झाल्यावर तयार होऊन बाहेर आलो.

"चला, जेवायला येताय ना?" हा बायकोचा प्रश्न आला.

"खरं सांगू? मला जेवण जाणार नाही एवढा दमलोय मी. तुम्ही जेवून घ्या मी आराम करतो." सगळे शांत झाले. गडबड निवळली.

"आणि हां! एक सांगायचे राहिले. मी उद्या सकाळीच उठून बाहेर गावी जाणार आहे. दोन तीन दिवसानी परत येईन." एवढे बोलून मी आराम करायला निघालो.

त्या रात्रभर तळमळत होतो. कूस बदलत होतो. मधेच डुलकी लागली की दचकून जागा होत होतो. सकाळी तारवटल्या डोळ्यानीच तयारी केली. कपडयांची बॅग भरून घेतली. आणि निघालो.

“एकटेच जाणार? कुठे चाललाय? चेहेरा बरोबर दिसत नाही. कुणाला तरी बरोबर नेलेत तर बरे नाही कां?” पत्नीने आपली काळजी दाखवत प्रश्नांची फैरी सोडली. काहीच उत्तर न देता मी बॅग उचलून चालू लागलो.

गाडी कोकणच्या रस्त्याला लागली. पनवेल मागे पडले होते. आता मन थाऱ्यावर येवू लागले. उद्या आपल्याला ते तीन लोक भेटणार. त्यांच्या सहवासात परत एकदा दंग होणार. त्यांच्या बरोबर मासे भात खाणार. त्यांच्या साठी घेतलेले कपडे त्यांना दिल्यावर त्यांचा खेळ पाहून आनंदीत होणार या विचाराने थंड होत होतो.

रात्री उशीरा गावी पोचलो. रात्रीचे १०-११ वाजले असतील. बस स्टँडकडच्या एका हॉटेलात कशीबशी जागा मिळाली. कॉटवर पडल्या पडल्या झोप लागली. सकाळीच उठलो. तयार होऊन निघालो. गावात एक सायकल दुकान होते. सायकल भाडयाने घेतली. पिशवी सायकला अडकवून जंगलात निघालो. मन अधीर झाले होते. कपड्याना पकडणाऱ्या काटेरी झुडपाना न जुमानता सायकल मारीत होतो. कधी एकदा पोहोचतो असे झाले होते.

नदी दिसू लागली. खाली जाणारी पायवाट झुडपानी झांकली गेल्यासारखी वाटली. घराकडे नजर वळवली. ते हळू हळू दृष्टीला पडू लागले तसे शंकेचे काहूर उठू लागले.

आता घराची जागा पूर्ण दिसू लागली होती. पडवी पाण्याने धूपून गेल्या प्रमाणे ढासळली होती. चारी भिंती. वेड्यावाकड्या झिजून पडल्या होत्या. पडक्या पडवीत चढलो तर मोडून तुटून गेलेली चूल दिसली. त्यावर शेवताचे भात करायचे मातीचे सोरकुल कलंडून पडले होते.

डोक्यात काहूर उठले. काय झाले यांचे? कुठे गेले हे लोक? काही बरे वाईट तर झाले नाही ना यांचे? बराच वेळ तसाच त्या पडक्या पडवीत बसून होतो काय करावे सुचत नव्हते. हळूहळू उठलो. झाडा झुडपातून वाट काढत नदीकडे निघालो. मनापासून वाटत होते. शिवू, शेवता आणि सखू तिथे तरी भेटावेत. नदीत डुंबताना, खिदळत पाणी उडवताना.

नदी शांत वहात होती. पात्रात कोणीच नव्हते. लांबवर जाणारी वळणे घेत, टेकडी आड नाहीशी होणारी नदी. मी तिच्याशी बोलू लागलो. तिला विनवू लागलो. ए बये एकदा तरी भेट होऊ दे ग त्यांची. तुला माहीत असणार ते कुठे आहेत ते. बराच वेळ असा वेड्या सारखा भिरभिरत फिरलो.

बसस्टँडच्या आजूबाजूला बरीच दुकाने होती. तिथेच रस्त्याच्याकडेला शिवू मासे घेऊन उभा राहायचा. एका दुकानात शिरून विचारले “काय हो इथे एक काळा कभिन्न, लंगोटी नेसून मासे विकणारा माणूस यायचा. संध्याकाळी इथेच उभा राहायचा. येतो का हो तो अजून?”

"कोण तो शिवड्या ठाकर? काय हल्ली दिसला नाय बा. पावसापूर्वी यायचा. आता नाय दिसला. काय वो पण तुमी हितले नाय दिसत. तुमाला कशाला पायजे तो?"

"काही नाही! माझी ओळख झाली होती काही वर्षापूर्वी. ते सगळे नदीकाठी जंगलांत राहायचे. मी तिथे चित्रे काढायला आलो होतो तेव्हा ओळख झाली होती त्यांची."

"अहो चित्र काढता तुम्ही? दाखवा तरी आमाला."

"नाही! आत्ता माझ्याकडे दाखवायला काहीच नाही. मी त्यांचीच खूप चित्रे काढली होती. ती मुंबईत फार गाजली, नावाजली म्हणून त्यांना भेटायला आलो होतो. त्यांच्या घरी गेलो तर घर पडून गेलेले दिसले. तिथे कुणीच रहात नाही आता." मी.

"कुठल्या जंगलात? कुठल्या नदीवर घर होते त्यांचे?"

मी जंगलाच्या दिशेने बोट दाखवत म्हणालो, "या बाजूला. ती डोंगर टेकडी दिसते ना त्याच्या या बाजूला. खालून नदी वाहाते वर जंगलात त्यांची झोपडी होती."

"अहो! या वर्षी फार पावस झाला वो. या गावातय पाणी शिरले. तिकडे ती खडकी नदी आहे. तिला फार पूर आला होता. या वर्षी. गावाभायेर शेती करणाऱ्यांची ढोरे पण व्हावन गेली. हिते सगळ्यांची वाट लावली पावसाने. कोण कोणाला शोदणार? मला नाय वाटत ते गावतील, आराम करा तुमी. उगीच कशाला शोधता. "

मला अनाहूत सल्ला देणाऱ्या त्या दुकानदाराचा राग आला. परत सायकल जंगलात दामटली. परत एकदा झोपडी निरखू लागलो. ज्या झाडाला टेकून ती झोपडी उभी होती. ते झाड दिसत नव्हते. त्या जागी एक मोठा खड्डा पडला होता. त्या बाजूची भिंत तर धूपून जाऊन फूटभरच राहीली होती. हा सगळा भाग नदी कडच्या बाजूचा होता. त्याच्या विरुद्ध बाजूची भिंत बरीच कमी झिजली होती. सर्व चित्र सांगत होते की पूराने त्या घराचा घास घेतला होता. मग त्या तिघांचे काय? नदीत ते पोहत होते. नदीला अन्नदाती मानत होते. तिनेच यांचा घास तर घेतला नाही? नकारी मनाचा राग आला. परत फिरलो घरा पासून थोडया अंतरावर येऊन नदी, आसपासचा परीसर, आकाश, पडके घर सगळे परत एकदा नजरेत साठवत बसलो.

आकाश निरभ्र होते. पण दक्षिणे कडून ढग नदीच्या दिशेने सरकताना दिसत होते. त्यांच्याकडे लक्ष गेले आणि त्यातच गुंगून गेलो. किती वेळ गेला देव जाणे. आता ते ढग नदीपात्रावर येऊन पोचले होते. तीन काळे पुंजके, चंदेरी झालर असलेले झर झर सरकत जवळ जवळ येत होते. अनिमिष नेत्रानी मी त्यांना पहाण्यात गढून गेलो होतो. त्यांचा काळा रंग गडद वाटत होता. ते आता नदी पात्रावर आले. मी

त्यांचा आकार पाहून थक्क झालो. मधला ढग आता असा काही दिसत होता की त्याने मनुष्याकृती धारण केली होती. हळू हळू ती स्पष्ट होत गेली. तो शिवू सारखा दिसू लागला. काळा काळा कोरीव. कमरेच्या खाली विरळ झालेला भाग पांढरट होऊन त्याच्या लंगोटीचा भास देत होता. बाजूच्या ढगानी देखिल मनुष्याकृती धारण केल्या होत्या. ते तीन ढग आता सखू, शिवू आणि शेवता हातात हात घालून फिरत आहेत असा भास देऊ लागला. पण त्यांना कमरे खाली पायाच्या जागी निमुळते होत जाणारे पट्टे दिसत होते. जणू कांही ते तीन देवदूत आहेत. मी त्यात रंगून गेलो. सखू, शिवू आणि शेवता मला भेटायलाच आलेत असा भास झाला.

एक वीज अशी कांही चमकली की तिघेही हसले असे भास व्हावा. त्या काळया कभिन्न चेहेऱ्यातून त्यांचे दात चमकले असे वाटले. नंतरचा गडगडाट खळखळत्या जोर जोरात हसण्या सारखा वाटला. दुसऱ्या क्षणी ढगांचा आकार बदलत गेला. आता ते माझ्या डोक्यावर येत होते. हलकासा वारा सुटला होता. अचानक टपोरे थेंब माझ्यावर पडू लागले. डोळे मिटून घेतले. सखू, शिवू आणि शेवताची ही भेट होती. ते मला भेटायला आले होते.

ते आकाशातले ढग, ती, वीज परत एकदा मला एक नवाच चित्र विषय देऊन गेले का? की त्यांनी त्यांचे अस्तित्व या जगात नाही हे सांगायसाठी ढगातून मला दर्शन दिले? त्यांनी त्याच वेळी टपोरे थेंब बनून माझी भेट घेतली? मी संभ्रमीत अवस्थेत उठलो व निघालो.

दुसऱ्या दिवशी सकाळीच गाडी मुंबईच्या दिशेने घेऊन निघालो. ते गांव लवकरात लवकर सोडायचे ठरवले.

मुंबईत पोहोचलो तो ही उद्विग्नावस्थेत. थकलो होतो. कंटाळलो होतो. काही करावे असे वाटत नव्हते. ती तीन रानपांखरे कधी भेटणार का या विचाराने तर पिच्छा पुरवला होता. कृतघ्न मी कृतघ्न. गेल्या वर्षीच का नाही जाऊन आलो त्यांच्याकडे? कां स्वतःतच गुरफटून बसलो? त्यांच्या मुळेच तर मला प्रसिद्धी, प्रतिष्ठा पैसा, घर, गाडी सर्व काही मिळाले होते. पण मी मात्र एवढी वर्षे त्यांच्याकडे जाण्याचे टाळत आलो. कृतघ्न! स्वार्थी! आप्पलपोटा! स्वतःचाच राग येवू लागला. याच अवस्थेत दोन तीन दिवस गेले. घरात मी बोलत नसल्यामुळे एक विचित्र तणाव पसरला. सर्वजण दबक्या आवाजात बोलत. मी घरातही तणावाचं कारण ठरत होतो.

एक दिवशी असाच पडून आढ्याकडे डोळे लावून पडलो होतो. आणि एकदम् शिवू, शेवता आणि सखू तिघेही आनंदाने हंसत खिदळत छताच्या स्वच्छ सफेत कॅनव्हासवर पसरू लागले. पळत एकमेकाना टाळ्या देत हसत बागडत होते. त्यांचा तो आनंदसोहळा पहात बसलो होतो. आता मागे पूर्ण

पडलेले छता शिवायचे घर दिसू लागले, नदी उमटली, नदीकडे जाणाऱ्या रस्त्यावर उगवलेली झाडे वाऱ्यावर लहरू लागली. नदीचा खळखळाट अगदी जवळून ऐकू येवू लागला. नदीचे पाणी वाढत गेले. रस्ता पाण्यात बुडाला. धरापर्यंत पाणी पोहोचू लागले. तरीही ते तीन आनंदी जीव आपल्या खेळात दंग होऊन गेले होते. आजूबाजूचे भान हरपून हसत खिदळत पळत होते. अचानक शेवताने पडवीतून खाली उडी घेतली. जोरात वाहणाऱ्या पाण्याने तिला आत खेचली मागाहून शिवूने उडी घेतली. दोघेही पाण्याखाली गेले तरी सखू हंसत खिदळत इकडे तिकडे पळत होती. वाढणाऱ्या पाण्याने आता पडवीतून वर प्रवेश केला. सखू त्यात थय थय नाचत होती. ती अंगणात उतरली पाणी गळ्यापर्यंत पोचले तिने एक सूर मारून पाण्याखाली बुडी मारली. आता फक्त रोरावणारी नदी पडक्या घराच्या भिंतींची टोके वर दिसत होती.

एवढयात घरामागून ती तिघेही हंसत खिदळत वर येवू लागली आकाशाच्या दिशेने झेप घेऊ लागली. घराच्यावर तो रेखीव शिवू, त्यामागे मी दिलेल्या लाल साडीतली शेवता, आणि पिवळ्या साडीतली सखू वर वर येवू लागले. साडयांची बोंदरे झालेली होती. शिवूचा लंगोट मळून पिवळा पडला होता. एवढ्या वर्षात त्या कपडयांचे आणि काय होणार? पण तरीही ते तिघे हसत खिदळत वर येत होते. आनंदाने नाचत आहेत असे वाटत होते. अजून ते वर आले आणि आकाशाकडे झेपवले. अरे पण हे काय? याना पायच नव्हते. एक मोठी लहर असल्यासारखी लांबलचक कमरेपासून निमुळती होत गेलेली आकृती लहरत पाण्यापर्यंत पोचत होती. तरी देखिल ते हसत होते. आकाशाकडे झेपावत होते. ते ढग झाले होते. ते माझ्याकडे पहात असल्याचा मला भास झाला. वाटले सुंदर हंसत ते निरोप घेत आहेत.

हळू हळू सर्व चित्र नाहीसे झाले. गालावर काहीतरी हुळहुळले म्हणून हाताने पुसले तर ते माझेच अश्रु होते. गाल पुसून मी विचारात पडलो. या प्रसंगाने त्यांनी मला आपली शेवटची हकीकत तर सांगीतली नसेल? की हा मनाचा खेळ आहे? खूप वेळ हा विचार करत पडलो होतो.

दुसऱ्या दिवशी कॅनव्हास काढला. एक प्रचंड मोठा कॅनव्हास. त्याच्यावर चित्रायला सुरवात केली. पूर आलेली नदी, पाण्यात बुडालेले पडके घर,. त्या आकाशात ते तिघे आनंदात हसत खिदळत आकाशाकडे झेप घेताना. कमरेखालचा भाग तसाच निमुळता होत गेलेला अगदी पाण्यापर्यंत. जगाचा निरोप घेताहेत. हे सर्व चित्रण मनःपटलावरून कॅनव्हासवर उतरत होते. अथकपणे मी मला स्टुडीओत कोंडून घेऊन ते पुरे करायला प्रयत्न गेले पंधरा दिवस करीत होतो.

शेवटचे ब्रश सखुचे हास्य करण्यात गेले. आणि मीच अनिमिष नजरेने ते न्याहाळीत बसलो.

त्या तिघाना जाता जाता मला एक सुंदर चित्रविषय दिला. तो मी कॅनव्हासवर उतरू शकलो. माझ्यासमोर एक अप्रतिम कलाकृती होती. ती मी रंगवली होती?

“अरे! अली काय अप्रतिम रंगवलेस रे हे चित्र.” “कुठून सुचते तुला?”

“काय कल्पना आहे! अजोड पेंटींग आहे रे!” मला भेटायला आलेले शंकर, सुरेश आणि मिलींद मागे होते.

“अरे ही मॉडेल भेटली आणि तू युसुफ अली चित्रकार म्हणून नावाजलास.”

“हे? हे? ही तर ती तीन रानपांखरे. अरे ही अशी तशी नाहीत. माझ्यातला चित्रकार बाहेर काढणारे मला घडवणारे हे तीन शिल्पकार आहेत. चित्रकाराचे शिल्पकार! युसुफ अली घडवणारे तीन शिल्पकार.” दुसऱ्या क्षणी मी स्तब्ध झालो.

********************

Please send your comments

लेखक – अरुण कुळकर्णी,

मो. ०७३५९२१२२११

e-mail- Kulkarni@technique-baroda.com or arungk1943@gmail.com

त्यांचा आणि सुधारलेल्या जगाचा काहीच संबंध नव्हता. ते आपल्याच विश्वात दंग होते.



मी काही चित्रकार नाही. पण व्यवसायात कित्येक मित्र बनवत जायचे स्वभावत:च अंगी असल्याने एस्. युसुफअलीशी दोस्ती झाली.

अतिशय सुंदर आर्टीस्ट असुनही कंगाल अवस्थेने त्याची पाठ सोडली नाही. कारण एकच जे कांही कमवे ते मित्रात वाटून मोकळा होई.

आत्ता पर्यंत आपण वाचलेल्या माझ्या गोष्टी मनोरंजक वाटण्याचे कारण त्याला असलेले सत्य घटनांचे पाठबळ हे असावे असा माझा समज आहे.

हा माझा मित्र पाच सहा वर्षापुर्वी आम्हाला सोडून गेला.  ही गोष्ट त्याची एका स्वयंसिद्ध कलाकाराची. समर्पण म्हणजे काय याचा धडा मला शिकवणाऱ्या एका कलाकाराची. त्याच्या धडपडीची. पैसे असो किंवा नसोत, मनाची व रक्तातली श्रीमंती म्हणजे काय ते शिकवणाऱ्या एका सुहृदाची.

आपल्याला आवडली तर जरूर कळवा.

अरुण कुळकर्णी.

# ई साहित्य प्रतिष्ठान

इंग्लंडची लोकसंख्या सहा कोटी आहे. आणि महाराष्ट्राची बारा कोटी. इंग्लीश वाचकांची संख्या आहे शंभर कोटी. आणि मराठी वाचक? कुठे आहोत आपण. माझा मराठाची बोलु कवतुके... अमृतातेही पैजा जिंके.... माउलींनी दाखवलेलं स्वप्न पूर्ण करू तरच आम्ही शिवबाचे मावळे.

आता मराठी ई पुस्तकं तुम्ही www.esahity.com वरून डाऊनलोड करा. किंवा esahity@gmail.com ला कळवून मेल ने मिळवा. किंवा 7710980841 या नंबर ला Whatsapp करून पुस्तके whatsapp मार्गे मिळवा. किंवा ई साहित्यचे app. https://play.google.com/store/apps/details?id=com.esahity.www.esahitybooks या लिंकवर उपलब्ध आहे. download करा.

आता ठरवलंय. मराठी पुस्तकांनी अवघं विश्व व्यापून टाकू. प्रत्येक मराठी सुशिक्षिताच्या मोबाईलमध्ये किमान पन्नास मराठी पुस्तकं असलीच पाहिजेत.

तुमची साथ असेल तर सहज शक्य आहे हे...

टीम ई साहित्य